**य:-अथर्वाणम्-पित्तरम्-देवबंन्धुम्-बृहस्पतिम्-नमसा- अव-च-गच्छात्-त्वम्-विश्वेषाम्-जनिता-यथा-स:-कविर्देव:-न दभायत्-स्वधावान्।**

**अनुवाद :** (य:) जे (अथर्वाणम्) अचल अर्थात अविनाशी (पित्तरम्) जगतपिता (देवबन्धुम) भक्तांचा वास्तविक सोबती अर्थात आत्म्याचा आधार (बृहस्पतिम्) जगतगुरु (च) आणि (नमसा) विनम्र पुजारी अर्थात विधिवत साधना करणाऱ्या साधकास (अव) सुरक्षेसह (गच्छात्) ने सतलोक जाणार आहेत. त्यांना सतलोक घेऊन जाणारे (विश्वेषाम्) सर्व ब्रम्हांडांना (जनिता) रचणारा/ निर्माण करणारा (न दभायत) काळाच्या समान धोका न देणाऱ्या (स्वधावान) स्वभाव अर्थात गुणांनीयुक्त(यथा) जसाच्या तसा अर्थात त्याचप्रमाणे (स:) ते (त्वम्) आपण (कविर्देव: कविर् देव:) कबीर परमेश्वर अर्थात् कविर्देव आहात.

**भावार्थ :** ज्या परमेश्वराच्या विषयी म्हटले जाते- ''त्वमेव माताच पिता त्वमेव, त्वमेव बन्धु च सखा त्वमेव, त्वमेव विद्याच द्रविणम् त्वमेव् सर्वम् मम् देव देव ॥ ते जे अविनाशी परमात्मा, सर्वांचे माता-पिता तथा बंधु सखा, जगत गुरु रुपामध्ये सर्वांना सत्य भक्तीप्रदान करून सतलोक घेऊन जाणारे, काळसमान धोका न देणारे सर्व ब्रह्मांडाची रचना करणारे कविर्देव (कबीर परमेश्वर) हेच आहेत.

**अनंतकोटी ब्रह्मांडाची रचना**



# ५. कबीर साहेब चारही युगामध्ये येतात.

**सतगुरु पुरुष कबीर हैं, चारों युग प्रवान ।**
**झुठे गुरुवा मर गए, हो गए भूत मसान ।।**

**''सतयुगामध्ये कविर्देव (कबीरसाहेब) यांचे सतसुकृत नावाने प्रकटन.''**

तत्वज्ञानाच्या अभावाने भक्तजन अशी शंका व्यक्त करतात की, विणकर (कोष्टी) रुपात कबीरजी तर वि.सं.१४५५ (सन १३९८) मध्ये काशीमध्ये आलेले आहेत. वेदांमधील 'कविर्देव' हे काशीचे विणकर (कोष्टी) कसे काय पूर्ण परमात्मा असू शकतील?

ह्या विषयासंबंधी सन्त रामपालदासजींची प्रार्थना आहे की, हेच पूर्ण परमात्मा कविर्देव (कबीर परमेश्वर) वेदांचे ज्ञान जे आहे त्या पूर्वी सतलोकामध्ये विराजमान होते आणि आपले वास्तविक ज्ञान (तत्वज्ञान) प्रदान करण्यासाठी चारही युगांमध्येही स्वयं प्रकट झालेले आहेत. सतयुगामध्ये 'सतसकृत' नावाने त्रेतायुगामध्ये 'मुनिंद्र' नावाने द्वापारयुगामध्ये 'करुणामय' नावाने तथा कलियुगामध्ये वास्तविक कविर्देव (कबीर प्रभु) नावाने प्रकट झालेले आहेत.

ह्याच्या अतिरिक्त अन्य रुप धारण करून कधीही प्रकट होऊन आपली लीला करून अंतर्ध्यान होतात. त्यावेळी लीला करण्यास आलेल्या परमेश्वरास अज्ञानी प्रजानन ओळखू शकत नाहीत. कारण सर्व महर्षि व संत म्हणून घेणाऱ्यांनी प्रभुस 'निराकार' म्हटलेले आहे. वास्तवामध्ये परमात्मा आकारामध्ये आहे. मनुष्य सदृश्य शरीरयुक्त आहे. परंतु पाच तत्वाने निर्माण झालेले शरीर नाही. एक तुर(तेज) तत्वाने बनलेले शरीर आहे जेव्हा इच्छिल तेव्हा येथे प्रकट होतात. ते कधी मातेपासून जन्म घेत नाहीत. कारण तेच सर्वांचे उत्पत्तीकर्ता आहेत.

पूर्ण प्रभु कबीरजी (कविर्देव) सतयुगामध्ये 'सतसुकृत' नावाने स्वयं प्रकट झालेले होते. त्यावेळी गुरुड, श्री ब्रह्मा इत्यादींना सतज्ञान समझावले होते. श्री मनु महिर्षिंनाही तत्वज्ञान समझवण्याचा प्रयत्न केला होता. परंतु श्री मनु परमेश्वरांच्या ज्ञानास सत्य न जाणून ते श्री ब्रह्माजीद्वारे ऐकलेल्या वेदज्ञानावर आधारीत होऊन तथा आपल्या द्वारा निर्माण केलेल्या वेदांच्या निष्कर्षावरच आरूढ राहिले. या उलट परमेश्वर सतसकृतजींचा उपहास करू लागले की, ''आपण तर सर्व विपरीत ज्ञान सांगत आहात''. ह्यामुळेच परमेश्वर सतसकृतांचे पर्यायी दुसरे नाव 'वामदेव' असे संबोधले गेले. ('वाम' याचा अर्थ उलटे, विपरीत जसे डाव्या हातास 'वाम' म्हणजेच 'उलटा हात' म्हटले जाते. जसे उजव्या हातास 'सुलटे' मानले जाते.

अशा प्रकारे सतयुगामध्ये परमेश्वर कविर्देवजी जे 'सतसुकृत' नावाने आले होते. त्यावेळच्या ऋषी व साधकांना वास्तविक ज्ञान त्यांनी समझावले होते. परंतु ऋषींनी ते स्विकारले नाही. अन् सतसकृतजींच्या स्थानी/परमेश्वरांस असलेल्या अज्ञानामुळे ''वामदेव'' म्हणू लागले.

यासाठी यजुर्वेद अध्याय १२ मंत्र ४ मध्ये विवरण आहे की, 'यजुर्वेदातील वास्तविक ज्ञानास वामदेव ऋषींनी योग्य प्रकारे जाणले आणि इतरांना समझावले. पवित्र वेदांचे ज्ञान समझवण्यासाठी कृपया विचार करा. ''जसे यजुर्वेद आहे, हे एक पवित्र पुस्तक आहे. याविषयी कोठे संस्कृतभाषे मध्ये विवरण केलेले आहे. जेथे 'यजु:' अथवा 'यजुम्'आदि शब्द लिखित असतील तरीही पवित्र पुस्तकाचाच बोध समझला जातो. अशाप्रकारे पूर्ण परमात्म्याचे वास्तविक नाव 'कविर्देव' असे आहे. या नावासच भिन्न भिन्न भाषेमध्ये कबीरसाहेब, कबीर परमेश्वर म्हटले गेलेले आहे. बहुतेक श्रद्धाळू शंका व्यक्त करतात की 'कविर' यास 'कबीर' कसे सिद्ध केले? व्याकरण दृष्टिकोणाने 'कवि:' चा अर्थ 'सर्वज्ञ' असा होतो. दासची (पुर्ण संत रामनालजी महाराजांची) प्रार्थना आहे की, प्रत्येक शब्दाचा कोणता ना कोणता अर्थ बनतोच. राहिली गोष्ट व्याकरणाची, भाषा प्रथम निर्माण झाली आहे. कारण वेदवाणी प्रभुद्वारा म्हटली गेली आहे. व्याकरणानंतर ऋषींद्वारे निर्माण झालेली आहे. के जे त्रुटिंयुत असू शकते. वेदांच्या अनुवादा (भाषा-भाष्य) मध्ये व्याकरण व्यतय आहे अर्थात असंगत व विरुद्ध भाव आहे. कारण की वेद वाणी मंत्राद्वारे, पदामध्ये आहे. जसे 'पलवल' शहराच्या आसपासचे व्यक्ति 'पलवल' शहराचा उच्चार 'परवर' असा करतात. तेव्हा कोणी म्हणेल की 'पलवल' शब्दास 'परवर' कसे काय सिद्ध केले? त्याचप्रमाणे 'कविर' यास 'कबीर' कसे काय सिद्ध केले असे म्हणणे मात्र (इतके) आहे. जसे क्षेत्रिय भाषेमध्ये 'पलवल' शहरास 'परवर' म्हणतात त्याचप्रमाणे 'कविर' यास 'कबीर' म्हटले जाते. अन वास्तविक प्रभु तेच आहेत. महर्षि दयांनदजींनी 'सत्यार्थ प्रकाश' समुल्लास '४' पृष्ठ १०० वर (दयानंद मठ दीनानगर पंजाब पासून प्रकाशीत) 'देवृकामा' चा अर्थ 'देवर' ची कामना करणे, असा केला आहे. देवृ यास पुर्ण ''र'' लिहून ''देवर'' असे केले आहे. ह्याप्रकारे 'कविर्' यास 'कविर' नंतर भाषा भिन्नतेने 'कबीर' लिहण्यामध्ये व बोलण्यामध्ये कोणतीच आपत्ती अथवा व्याकरण त्रुटी नाही. पूर्ण परमात्मा हे कविर्देव आहेत. हेच प्रमाण यजुर्वेद अध्याय २९ मंत्र २५ तथा 'सामवेद' संख्या १४०० मध्ये ही आहे. ते खालीलप्रमाणे.

**'यजुर्वेद' अध्याय २९ चा श्लोक २५ (संत रामपालदास द्वारा भाषा-भाष्य)**

**समिध्दोऽअद्य मनुषो दुरोणे देवो देवान्यजसि जातवेद:।**
**आ च वह मित्रमहश्चिकित्वान्त्वं दूत: कविरसि प्रचेता: ॥२५॥**



**समिध्द;-अद्य-मनुष:-दुरोणे-देव:-देवान्-यज्-असि-जात-वेद:-**
**आ-च-वह-मित्रमह:-चिकित्वान्-त्वम्-दूत:-कविर्-असि-प्रचेता:।**

**अनुवाद :** (अद्य) आाज अर्थात वर्तमानामध्ये (दुरोणे) शरीर रुपी महलामध्ये दुराचारपुर्वक (मनुष्य:) असत्य पुजेमध्ये लीन मननशील व्यक्तींना (समिद्ध:) लावलेला अग्नी अर्थात शास्त्र विधिरहित वर्तमान पूजा जी हानीकारक असते. त्या स्थानावर (देवान्) देवतांची (देव: ) देवता (जातवेद:) पूर्ण परमात्मा सतपुरुषांची वास्तविक (यज्) पूजा (असि) आहे.(आ) दयाळू (मित्रमहा:) जीवांचे वास्तविक सोबती पूर्ण परमात्माच आपल्या (चिकित्वान) स्वस्थ ज्ञानास अर्थात यथार्थ भक्तीस (दूत:) संदेशवाहक रुपामध्ये (वह) घेऊन येणारे (च) अन् (प्रचेता) बोध करुन देणारे (त्वम) आपण (कविरसि) कविर्देव अर्थात कबीर परमेश्वर आहात.

**भावार्थ :** ज्यावेळी पूर्ण परमात्मा प्रकट होतात त्या वेळी सर्व ऋषि व संत जन शास्त्रविधि त्याग करून मनमुखी आचरण अर्थात पूजाद्वारे सर्व भक्त समाजास अयोग्य मार्गदर्शन करत असतात. तेव्हा आपल्या तत्वज्ञान अर्थात शास्त्रोक्त विधीचे स्वस्थ ज्ञानाचे संदेशवाहक बनून स्वयंच 'कविर्देव' अर्थात कबीर प्रभुच येतात.

सामवेद संख्या १४००, 'सामवेद उतार्चिक' अध्याय नं.१२, खंड नं.३, श्लोक नं.५ **(संत रामपाल दासद्वारा भाषा-भाष्य:)**

**भद्रा वस्त्रा समन्या३वसानो महान् कविर्निवचनानि शंसन् ।**
**आ वच्यस्व चम्वो: पूयमानो विचक्षणो जागृविर्देववीतौ ॥५॥**

**भद्रा-वस्त्रा-समन्या-वसान:-महान्-कविर-निवचनानि्-शंसन्-आवच्यस्व-चम्वो:-पूयमान: विचक्षण: जागृवि:-देव-वीतौ।**

**अनुवाद :** (विचक्षण:) चतुरव्यक्तींनी (आवच्यस्व) आपल्या वचनाद्वारे म्हटलेले असते की, 'जे आम्ही प्रवचन करतो त्याचे अनुसरण करा'. त्या चतुर व्यक्तींनी पूर्णब्रह्मांची पूजा न सांगता अन्य उपासनेचे मार्गदर्शन करून अमृताच्या स्थानी (पूयमान:) अन्य उपासनारूपी पूयमयघाणीस (जसे भूत-प्रेत पूजा, पित्र पूजा, तीन गुणांची (रजगुण-ब्रह्मा, सतगुण-सतगुण-विष्णू, तमगुण-शिवशंकर) तथा ब्रह्म-काळा पर्यंतची पूजा) (चम्वो:) आदरयुक्त आचमन /आहारीत करवून घेत आहेत. अर्थात् शास्त्रविरुद्ध अयोग्य ज्ञानास समाप्त करण्यासाठी (भद्रा) परमसुखदायक (महान कविर्) महान कविर अर्थात पूर्ण परमात्मा कबीर (वस्त्रा) सशरीर साधारण वेशभूषेमध्ये अर्थात वेशभूषा, संतभाषेमध्ये यास चोला/शरीररुपी वस्त्र याचाच अर्थ 'शरीर' असा होतो. जर कोण्या संताचा देहान्त होतो तेव्हा म्हणतात चोला/शरीर रुपी वस्त्रास त्यागून गेले.''(समन्या) आपल्या सतलोकाच्या शरीर सदृश्य अन्य शरीर कमी तेजपूंजाचे धारण करुन (वसान:) सामान्य व्यक्तीसमान जीवन

जगून काही दिवस या संसारामध्ये अतिथी समान वास्तव्य करुन (निवचनानि) आपल्या शब्दावली, कबीरवाणी इत्यादींच्या माध्यमाने सत्यज्ञान (शंसन्) वर्णन करून (देव) पूर्ण परमात्म्याच्या (वीतौ) लपून राहिलेल्या सर्गुण-निर्गुण ज्ञानरुपी धनास (जागृवि:) जागृत करतात.

**भावार्थ :** जसे 'यजुर्वेद' अध्याय ५ यंत्र १ मध्ये म्हटले आहे की, ''अग्नेः तनः असि''-परमेश्वर सशरीर आहे. ''विष्णवे त्वा सोमस्य तनुः असि''= त्या अमर प्रभुचे पालनपोषण करण्यासाठी अन्य शरीर आहे. जे अतिथी रुपामध्ये काही दिवस या संसारामध्ये येतात तत्वज्ञानाने अज्ञान निद्रेमध्ये झोपलेल्या प्रभु प्रेमींना जागृत (जागे) करतात, हेच प्रमाण ह्या मंत्रांमध्ये आहे की, काही कालावधीसाठी पूर्ण परमात्मा कर्विदेव अर्थात कबीर प्रभु आपले रुप बदलून सामान्य व्यक्ति समान रुप बनवून पृथ्वी मंडळावर प्रकट होतात. आणि 'कविर्निवचनानि' शसन अर्थात 'कविर्वाणी' सांगतात ज्या माध्यमातून तत्वज्ञानास जागृत करतात व त्यावेळी महर्षि म्हणवून घेणारे चतुर प्राणी मिथ्या ज्ञानाच्या आधारावर शास्त्रविधि रहित पूजा रूपी पूयमय घाणीस श्रद्धेसह आचमन/ आहारीत करवून अर्थात पूजा करवून घेत असतात. त्यावेळी पूर्ण परमात्मा स्वयं प्रकट होऊन तत्वज्ञानाद्वारे शास्त्र विधिनुसार साधनाचे ज्ञान प्रदान करतात.

पवित्र ऋग्वेदाच्या खालील मंत्रामध्ये ही परमात्म्याची ओळख सांगितलेली आहे की, जे पूर्ण पूर्णपरमात्मा काही कालावधी करीता संसारामध्ये लीला करण्यासाठी येतात तेव्हा शिशु रुप धारण करतात. त्या पूर्ण परमात्याचे पालन पोषण (अध्न्य धेनवः) कुमारी /प्रसुती न झालेली) गायीद्वारे होते. नंतर लीला करुन मोठे होतात. तेहा आपल्या प्राप्तीचा व सतलोक जाण्याचा, अर्थात पूर्ण मोक्ष मार्गाचे तत्वज्ञान (कर्विर्गिभिः) कबीर वाणीद्ारा, कवितांच्याद्वारे सांगतात. ज्या कारणाने प्रसिद्ध 'कवि' म्हणून संबोधले जातात परंतु तेच स्वयं 'कविर्देव' पूर्ण परमात्माच असतात. जे तिसऱ्या मुक्तीधामी 'सतलोका' मध्ये वास्तव्य करतात.

**ऋग्वेद मंडळ ९ सूक्त १ मंत्र ९ तथा सूकत ९६ मंत्र १७-१८**

**ऋग्वेद मंडळ ९ सक्त १ मंत्र ९**

**अभी इमं अध्न्या उत श्रीर्णान्त धेनवः शिशुम । सोममिन्द्राय पातवे॥९॥**
**अभी इमम्-अध्न्याः उत श्रीणन्ति धेनवः शिशुम् सोमम् इन्द्राय पातवे॥**

**अनुवाद :** (उत) विशेष करुन (इमम्) ह्या (शिशूम्) बालक रुपामध्ये प्रकट (सोमम्) पूर्ण परमात्मा अमर प्रभुचे (इन्द्राय) सुख सुविधाद्वारे अर्थात आहार खाण्या पिण्याद्वारे, जे शरीर वृद्धिस प्राप्त होते त्यास (पातवे) वृद्धिसाठी (अभि) पूर्णपणे (अध्न्या धेनवः) ज्या प्रसव झालेली नाही अशा गाईच्या अर्थात कुमारी गाईच्या (श्रीणन्ति) दुधाने पालन-पोषण होते.

**भावार्थ :** पूर्ण परमात्मा अमर पुरुष जेव्हा लीला करणारे बालक रुप धारण



करुन स्वयं प्रकट होतात. त्या वेळी कुमारी गायी आपल्य आप दूध देते, ज्याने पूर्ण प्रभुंचे पालनपोषण होते.

**ऋग्वेद मंडल ९ सुक्त ९६ मंत्र १७**

**शिशुम् जज्ञानम् हर्य तम् मृजन्ति शुम्भन्ति- वह्निमरूतः गणेन।**
**कविर्गीर्भि काव्येना कविर् सन्त् सोमः पवित्रम् अत्येति रेभन्॥**

**अनुवाद :** पुर्ण परमात्मा (हर्य शिशुम) मनुष्याच्या बालाकाच्या रुपामध्ये (जज्ञानम) जाणून बूजून प्रकट होतात. आणि आपल्या तत्वज्ञानास (तम्) त्या समयी (मृजन्ति) निर्मळपणे (शुभन्ति) उच्चारण करतात. (वह्नि) प्रभू प्राप्तिचा विरह अग्नी लागलेल्या (मरूतः) वायूसमान शीतल भक्त (गणेन) समुहासाठी (काव्येना) कवितांद्वारे काव्याने (पवित्रम अत्येति) अत्यधिक वाणी निर्मळतेसह (कविर्गीर्भि) कविर वाणी अर्थात् कबीरवाणी द्वारे (रेभन्)उंच स्वराने संबोधन करून सांगतात. (कविर सन्त् सोम;) ते अमर पुरुष अर्थात सतपुरुषच संत अर्थात ऋषीरुपामध्ये स्वयं कविर्देवच असतात. परंतु त्या परमात्म्यास न ओळखता 'कवि' म्हणू लागतात.

**भावार्थ :** वेद बोलणारा ब्रह्म म्हणत आहे की, विलक्षण मनुष्याच्या बालक रुपामध्ये प्रकट होऊन पूर्ण परमात्मा कविर्देव आपल्या वास्तविक ज्ञानास आपल्या 'कविर्गिर्भिः' अर्थात कबीरवाणीद्वारे निर्मळ ज्ञानास, आपल्या हंसात्म्यांना अर्थात पुण्यात्मे अनुयायांना कविरुपामध्ये कवितांच्या लोकोक्तियांच्याद्वारे संबोधन करून अर्थात उच्चारण करुन वर्णन करतात. तेच स्वयं सतपुरुष कबीरच असतात.

**ऋग्वेद मंडल ९ सुक्त ९६ मंत्र १८**

**ऋषिमना य ऋषिकृत् स्वर्षाः सहस्राणीथः पदवीः कवीनाम् ।**
**तृतीयम् धाम महिषः सिषा सन्त् सोमः विराजमानु राजति स्टुप् ॥**

**अनुवाद** : वेद सांगणारा ब्रह्म म्हणत आहे की, (य) जे पूर्ण परमात्मा विलक्षण बालकाच्या रुपामध्ये येऊन (कवीनाम) प्रसिद्ध कविंची (पदवी) उपाधी प्राप्त करुन अर्थात एक संत किंवा ऋषिची भूमिका करतात. त्या (ऋषिकृत) संतरुपामध्ये प्रकट झालेल्या प्रभुंद्वारे रचलेल्या (सहस्राणीथः) हजारो वाणी (ऋषिमना) संत स्वभावाच्या व्यक्ती अर्थात भक्तांसाठी (स्वर्षाः) स्वर्गतुल्य आनंददायक होतात. (सन्त् सोमः) ऋषि संत रुपामध्ये प्रकट झालेले ते अमर पुरुष अर्थात सतपुरुषच असतात. ते पूर्ण प्रभु (तृतीया) तीसरे (धाम) मुक्ति लोक अर्थात सतलोकाच्या (महिषः) सुदृढ पृथ्वीस (सिषा) स्थापीत करून (अनु) तत्पश्चात् मानवसदृश्य संत रुपामध्ये (स्टुप्) उंच किल्लारुपी सिंहासनावर (विराजमनु रार्जात) उज्ज्वल स्थूल आकारामध्ये अर्थात् मानवसदृश्य शरीरामध्ये विराजमान आहेत.

**भावार्थ :** मंत्र १७ मध्ये 'कविर्देव' शिशु रुप धारण करून येतात. लीला करत

मोठे (वृद्धींगत) होतात. कवितांद्वारे तत्वज्ञान वर्णन करण्या कारणे 'कवि'ची पदवी प्राप्त करतात. अर्थात त्यास 'कवि' असे संबोधू लागतात. वास्तवामध्ये ते पूर्ण परमात्मा कविर (कबीर प्रभु) च आहे. त्यांच्याद्वारे रचलेली अमृतवाणी कबिरवाणी (कविर्गिभि: अर्थात कविर्वाणी) म्हणून संबोधली जाते. ती भक्तांसाठी स्वर्गतुल्य सुखदाई होते. तेच परमात्मा तीसरे मुक्तीधाम अर्थात सतलोकाची स्थापना करुन तेजोमय मानव सदृश्य शरीरामध्ये आकारस्वरूपात विराजमान आहेत.

ह्या मंत्रांमध्ये 'तीसरे धाम' सतलोकास म्हटले आहे. जसे पहिले ब्रह्मलोक जे २१ ब्रह्मांडाचे क्षेत्र आहे दुसरे परब्रह्माचे लोक जे सप्तसंख ब्रह्मांडाचे क्षेत्र आहे, तीसरे परम अक्षर ब्रह्म अर्थात पूर्णब्रह्माचे ऋतूधाम अर्थात सतलोक आहे.

## त्रेतायुगागध्ये कविर्देव (कबीरसाहेब) यांचे 'मुनिन्द्र' नावाने प्रकटन

### 'नल तथा नील यांस शरणामध्ये घेणे'.

त्रेतायुगामध्ये स्वयंभु कविर्देव (कबीरपरमेश्वर) रुपान्तर करून 'मुनिद्र' ऋषीच्या नावाने आले होते. एक दिवस अनल अर्थात 'नल' व अनील अर्थात 'नील'ने मुनिंद्र साहेबजींचा सत्संग ऐकला. दोन्ही भक्त एकमेकांचे मावसभाऊ होते. त्यांच्या मात्या-पित्यांचे निधन झाले होते. नल व नील दोघेही शारीरीक व मानसिक रोगाने अत्याधिक पीडीत होते. सर्व ऋषी व संताना कष्ट निवारणाची प्रार्थना त्यांनी केली होती. सर्व संतांनी सांगितले होते की, ''हे तुमच्या प्रारब्धा (नशीबाच्या) च्या पापकर्मांचा दंड आहे, हे तुम्हास भोगायलाच लागेल याचे कोणतेच समाधान नाही. दोन्ही मित्र जीवनाकडून निराश होऊन मृत्यूची वाट पहात होते.

सत्सगांच्या उपरान्त दोघांनीही परमेश्वर कविर्देव (कबीरसाहेबजी) उर्फ 'मुनिद्र' ऋषीजींचे चरण स्पर्श केले अन् परमेश्वर मुनिंद्रजींनी डोक्यावर हात ठेवता तत्क्षणी दोघांचेही असाध्य रोग छू मंतर (नष्ट) झाले अर्थात् दोन्ही नील तथा नल स्वस्थ झाले. ह्या अद्‌भूत चमत्कारास पाहून प्रभुंच्या चरणी पडून तासन् तास रडत राहिले व म्हटले की, ''आज आम्हांस प्रभु भेटले, ज्यांचा आम्हाला शोध होता.'' ह्या गोष्टीने प्रभावीत होऊन त्या दोघांनीही मुनिन्द्र साहेबजींच्या कडून नाम (दीक्षा) घेतली तथा मुनिन्द्र साहेबजींच्या सोबतच सेवेमध्ये राहू लागले. पूर्वी संतांचा समागम पाण्याची व्यवस्था पाहून नदीच्या किनारी होत असे. नल अन् नील दोघेही अत्यंत प्रभु प्रेमी व भोळे आत्मे होते. परमात्म्यामध्ये त्यांची अत्यंत श्रद्धा होती. ते सेवा फार करायचे समागम (सत्संगामध्ये) मध्ये रोगी, वृद्ध व विकलांग भक्तजन यायचे तेव्हा त्यांचे वस्त्र धुवायचे तथा भांडी स्वच्छ



करायचे. परतु ते भोळ्या मनाचे होते. कपडे धुत असताना सत्संगामध्ये जी प्रभुंची कथा ऐकलेली असे, त्याची चर्चा करू लागायचे. ते दोघे प्रभु चर्चेमध्ये अत्यंत धुंद रहायचे. की ज्यामुळे वस्तु नदीच्या जलामध्ये हरवून जायच्या. त्यांना कळायचे देखील नाही. कोणाच्या चार वस्तू घेऊन जायचे अन दोनच वस्तू परत आणून द्यायचे. भक्तजन म्हणायचे की, ''भाऊ आपण सेवा तर अत्यंत करता परंतु आमचे तर काम बिघडवून टाकता आता ह्या हरवलेल्या वस्तु आम्ही कोठून घेऊन येऊ? आपण आमची सेवा करायची सोडून द्या. आम्ही आमची सेवा स्वत:च करू.'' हे ऐकून नल व निल रडायला लागायचे व म्हणायचे, ''आमची सेवा नाकारू नका. आम्ही पुढील वेळी कोणतीच वस्तू हरवणार नाही.'' परंतु नंतर तेच व्हायचे. पुन्हा प्रभुचर्चेमध्ये लागायचे अन् वस्तू डूबवायचे. भक्तजनानी मुनिन्द्रजींना प्रार्थना केली की, ''भगवंत, कृपा करा, नल व नील यांना समजाऊन सांगा. ते दोघे मानत नाहीत. अन् काही म्हटले तर रडू लागतात. आमची तर अर्ध्यासुद्धा वस्तू परत आणत नाहीत. हे दोघे तर भगवानाच्या चर्चेमध्ये मग्न होतात. अन वस्तू बुडवतात. मुनिन्द्र साहेबांनी एक दोन वेळा त्यांना समजावले. ते रडू लागत, ''साहेब, आमची सेवा आमच्यापासून दूर करू नका.'' सद्‌गुरु मुनिन्द्रसाहेबानी त्यांना आशीर्वाद देऊन म्हटले की, ''बाळांनो, नल व नील फार सेवा करा, यापुढे तूमच्या हातांनी कोणतीही वस्तू, अगदी दगड किंवा लोखंड हेसुद्धा बुडणार नाही. ''

आपण रामायण ऐकले असेलच एकदा सीताजींस रावण फसवून पळवून घेऊन गेला. भगवान रामचंद्रांनाही माहित नसते की सीताजींस कोणी पळवून घेऊन गेले? श्री रामचंद्र अनेक ठिकाणी सीतेचा शोध घेतात. हनुमाननी शोध घेऊन सांगितले की, 'सीतामाता, लंकापति रावण (राक्षस) च्या कैदेमध्ये आहे.' हे कळल्यावर भगवान रामाने रावणाजवळ शांतिदूत पाठविला आणि सीतेला परत करण्याची प्रार्थना केली. परंतु रावणाने ते मान्य केले नाही. युद्धाची तयारी झाली. तेव्हा समस्या अशी उभी राहिली की, समुद्रातून वानरसेना कशी काय पार होईल?

भगवान श्री रामचंद्रांनी तीन दिवसांपर्यंत गुडघ्यापर्यंत पाण्यामध्ये उभे राहून हात जोडून समुद्रास प्रार्थना केली की, 'मार्ग मोकळा करुन द्या', परंतु समुद्राने एकही ऐकले नाही. समुद्र मानत नाही, हे पाहून श्रीरामाने त्यास अग्नीबाणाने जाळायचे ठरवीले. भयभीत समुद्र एक ब्राम्हणाच्या रुपामध्ये समोर येऊन श्रीरामांस म्हटला की, 'भगवान, आपआपल्या मर्यादा आहेत. मला जाळू नका. माझ्यामध्ये कितीतरी अनंत जीव-जंतू आहेत. जर आपण मला जाळून जरी टाकले तरीही आपण मला पार करू शकत नाही. कारण येथे अत्यंत खोल खड्डा निर्माण होईल ज्यास आपण कधीही पार करू शकणार नाही.''

समुद्राने म्हटले, ''भगवान असे काहीतरी करा की, साप ही मरेल अन काठीही

तूटणार नाही. माझी मर्यादाही राहील अन् आपल्यासाठी पुलसुद्धा बनेल.'' तेव्हा भगवान श्रीरामाने समुद्रास विचारले 'ते काय आहे?'' ब्राम्हणरुपामध्ये उभ्या समुद्राने म्हटले की, ''आपल्या सेनेमध्ये 'नल' आणि 'नील' नामक दोन सैनीक आहेत. त्यांच्याजवळ त्यांच्या गुरुदेवांपासून प्राप्त एक अशी शक्ती आहे की, त्यांच्या हातून दगडही पाण्यावर तरंगले जातात. प्रत्येक वस्तू अगदी लोखंडही तरंगले जाते.'' श्री रामचंद्रांनी नील व नल यांस बोलावले. अन त्यांना विचारले की, 'तुमच्याजवळ अशी कोणती शक्ती आहे काय?' तेव्हा नल व नील म्हटले की, 'होय, आमच्या हातातून टाकलेले दगडही पाण्यामध्ये बुडत नाहीत.' तेव्हा श्रीरामाने म्हटले की, 'परिक्षण करून दाखवा.' त्या अज्ञानांनी (मुर्खांनी) विचार केला की, आज सर्वांसमोर आपली महिमा होईल. त्या दिवशी त्यांनी आपल्या गुरुदेव मुनिन्द्र (कबीर साहेबजी) यांचा, असा विचार करुन स्मरणही केले नाही. त्यांना वाटले की जर आपण त्यांना (गुरुदेवांना) स्मरण करू तर श्रीराम कदाचीत असा विचार करणार नाही ना की आमच्याजवळ शक्ती नाही. हे तर कोठून दूसरीकडून मागत आहेत. त्यांनी असा विचार करून दगड उचलून पाण्यामध्ये टाकला. परंतु तो दगड पाण्यामध्ये बुडला. नल व नील यांनी फार प्रयत्न केला. परंतु त्यांच्याकडून दगड तरंगला नाही. तेव्हा भगवान रामने समुद्राकडे पाहिले जणू काही त्यांना म्हणायचे होते की, ''आपण तर असत्य सांगत आहात, ह्या दोघांमध्ये तर कोणती शकती नाही''. समुद्राने म्हटले की, ''नल-नील आज तुम्ही आपल्या गुरुदेवांना स्मरण केले नाही. मुर्खांनो (अज्ञानींनो) आपल्या गुरुदेवांना स्मरण प्रथम करा. ते दोघेही समजून गेले की, आज त्यांनी चुक केलेली आहे. त्यांनी सतगुरु मुनिंन्द्रसाहेबर्जीना स्मरले. सत्गुरु मुनिन्द्र (कबीर साहेब) तिथे प्रकट झाले. भगवान रामचंद्रजींनी म्हटले की 'हे ऋषिवरा, माझे दुर्भाग्य आहे, की आपल्या सेवकांकडून दगड तरंगत नाहीत.' मुनिन्द्र साहेबजी म्हटले 'आता त्यांच्या हातांनी तरगणार नाहीत कारण त्यांना अभिमान झालेला आहे. सतगुरुच्या वाणीमध्ये प्रमाण आहे की,

**''गरीब, जैसे माता गर्भ को, राखे जतन बनाय,**

**ठेस लगे तो क्षीण होवे, तेरी ऐसे भक्ति जाय।**

त्या दिवसानंतर नल तथा नील यांची ती शक्ती समाप्त झाली. श्री रामचंद्रजीनी परमेश्वर मुनिन्द्रसाहेबजींना म्हटले की, ''हे ऋषीवर, माझ्यावर मोठी आपत्ती आलेली आहे. दया करा, कोणत्यातरी प्रकारे सैन्य पलीकडे पर होऊ दे'' मुनिन्द्रसाहेबनी म्हणाले की, 'हा जो समोरचा डोंगर आहे. मी त्या डोंगराच्या चारी दिशांनी एक रेखा (रेषा) आखलेली आहे. त्या रेषेमधील दगड उचलून घेऊन या. ते बुडणार नाहीत.'' श्रीरामाने परिक्षणासाठी दगड मागविले. त्या दगडास पाण्यावर ठेवताच तो तरंगु लागला. नल व नील कारागीरही (शिल्पकार) होते. हनुमानजी प्रतिदिन भगवंतास स्मरण करत असत.



त्यांनी आपली दैनिक क्रिया भक्तीसोबत ठेवून राम राम सुद्धा ते लिहीत राहिले. आणि त्यांनी पहाडचे पहाड उचलून आणले. जल-नील त्यांना जोडून तोडून पुलामध्ये लावत होते. अशा प्रकारे पुल तयार झाला. धर्मदासजी म्हणत आहे की,

**रहे नल नील जतन कर हार, तब सतगुरु से करी पुकार।**

**जा सत रेखा लिखी अपार, सिन्धु पर शिला तिराने वाले।**

**धन-धन सतगुरु सत कबीर, भक्त की पीर मिटाने वाले।**

कोणी म्हणतात की, हनुमानजींनी दगडावर नाव लिहीलेले होते. त्यामुळेच दगड तरंगले. अन् कोणी म्हणतात की, नल-नील यांनी पुल निर्माण केला होता. कोणी म्हणतात की श्रीरामांनी पुल बनवीला होता. परंतु ह्यासंबंधी सत्य कथा अशी आहे. जी आपणांस वर सांगितलेली आहे.

**('सतकबीर की साखी' - पृष्ठ १७९ ते १८२ पर्यंत)**

## पीव पिछानास अंग

**कबीर- तीन देव को सब कोई ध्यावै, चौथे देव का मरम न पावै।**
**चौथा छाड़ पंचम को ध्यावै, कहै कबीर सो हम पर आवै।।३।।**

**कबीर- ओंकार निश्चय भया, यह कर्ता मत जान।**
**साचा शब्द कबीर का, परदे मांही पहचान।।५।।**

**कबीर- राम कृष्ण अवतार हैं, इनका नांही संसार।**
**जिन साहेब संसार किया, सो किन्हूं न जन्म्या नार ।।१७।।**

**कबीर- चार भुजा के भजन में, भूलि परे सब संत।**
**कबिरा सुमिरो तासु को, जाके भुजा अनंत।।२३।।**

**कबीर- समुद्र पाट लंका गये, सीता को भरतार।**
**ताहि अगस्त मुनि पीय गयो, इनमें को करतार।।२६।।**

**कबीर- गिरवर धारयो कृष्ण जी, द्रोणागिरि हनुमंत।**
**शेष नाग सब सृष्टि सहारी, इनमें को भगवंत।।२७।।**

**कबीर- काटे बंधन विपति में, कठिन किया संग्राम।**
**चिन्हों रे नर प्राणियां, गरूड बड़ो की राम ।।२८।।**

**कबीर- कह कबीर चित चेतहूं, शब्द करौ निरूवार।**
**श्रीरामहि कर्ता कहत हैं, भूलि परयो संसार।।२९।।**

**कबीर- जिन राम कृष्ण व निरंजन कियो, सो तो करता न्यार।**
**अंधा ज्ञान न बूझई, कहे कबीर विचार ।।३०।।**

## ‘द्वापारयुगामध्ये कविर्देव (कबीर साहेब) ‘करुणामय’ नावाने प्रकट झाले.’

परमेश्वर कबीर (कविर्देव) द्वापार युगामध्ये ‘करुणामय’ नावाने प्रकट झालेले होते. त्यावेळी एक वाल्मीक जातीमध्ये जन्मलेला भक्त सुदर्शन सुपथ (हरिजन) यांचा शिष्य झालेला होता. ह्याच सुदर्शनजींनी पांडवांचा यज्ञ यशस्वी केला होता. हाच यज्ञ श्रीकृष्णजींच्या भोजन करण्याने सफल झालेला नव्हता, न तेहतीस करोड देवतांच्या, ८८ हजार ऋषिंच्या, १२ करोड ब्राम्हणांच्या, ९ नाथांच्या, ८४ सिध्दांच्या भोजन करण्यामुळे सुद्ध यशस्वी झालेला नव्हता. भक्त सुदर्शन सुपथ वाल्मीक पूर्ण गुरुजींपासून वास्तविक तीन-मंत्र प्राप्त करून सतसाधना गुरु मंर्यादेमध्ये राहून करत होते. त्याच्या भोजनामुळेच पांडवांचा यज्ञ सफल झाला.

## ‘‘द्वापार युगामध्ये इन्द्रमतिस शरणामध्ये घेणे’’

द्वापार युगामध्ये चन्द्रविजय नावाचा एक राजा होऊन गेला. त्याची पत्नी इंद्रमती अत्यंत धार्मिक प्रवृत्तीची स्त्री होते. ती संत-महात्म्यांचा अत्यंत आदर करत असे. त्यांनी एक गुरुदेवही केले होते. (दीक्षा घेतली होती.) त्यांच्या गुरुदेवांनी त्यांना सांगितले होते की, ‘‘मुली, साधुसंतांची सेवा करणे आवश्यक आहे. संतांना भोजन दिल्याने फार फायदा होतो. एकादशीचे व्रत, मंत्राचे जाप इत्यादी साधना ज्या गुरुदेवांनी सांगितल्या होत्या. त्यामध्ये, भगवत भक्तीमध्ये ती अत्यंत दृढतेने लागली होती. गुरुदेवांनी सांगितले होते की, ‘‘भोजन करवशील तर तु पुढेही राणी बनशील. अन् तूला स्वर्गप्राप्ती होईल.’’ राणी इंद्रमतीने ठरविले की, प्रतिदिन एका संतास भोजन अवश्य करावयाचे तीने ही प्रतिज्ञा मनामध्ये बिंबवली की, ‘मी आहार नंतर करेन. प्रथमत: संतास भोजन करवेल. त्यामुळे मला नेहमी स्मरण राहील अन् कधीही मी विसरणार नाही.’ राणी प्रतिदिन प्रथमत: एका संतास भोजन द्यायची नंतरच स्वयं भोजन करायची. अनेक वर्षापर्यंत हा क्रम चालत राहिला.

पुढे एकदा हरिद्वारास कुंभमेळा भरला होता. जितके त्रिगुणी मायेचे उपासक संत होते त्या सर्वांनी गंगा नदीमध्ये स्नानासाठी प्रस्थान केलेले होते. याकारणाने कित्येक दिवस राणीस भोजन करवण्यासाठी कोणी संत मिळालाच नाही. राणी इंद्रमतिने स्वयंही भोजन केले नाही. चौथ्या दिवशी आपल्या दासीस म्हणाली की, ‘‘पहा तरी, कोणी संत भेटतो का? नाहीतर आज तुझी ही राणी जीवित राहणार नाही. आज माझे प्राण निघून जातील. तरीही मी भोजन करणार नाही.’’ ते दीन दयाळ कबीर परमेश्वर आपल्या पुर्वीच्या भक्तास शरण येण्यासाठी न जाणे कोणते कारण बनवितात? दासीने वर महालाच्या गच्चीवर जाऊन समोर पाहिले तर एक संत समोरून येत होते. श्वेत वस्त्र परीधान केलेले. द्वापर युगामध्ये परमेश्वर



कबीर ‘करुणामय’ नावाने प्रकट झाले होते. दासीने खाली येऊन राणीस सांगितले की, ‘एक व्यक्ती आहे जे साधु समान दृष्टीस येत आहेत. राणीने म्हटले की, ‘‘लवकर जाऊन त्यांना बोलावून आण.’’ दासी महालाच्या बाहेर गेली. अन् तीने प्रार्थना केली की, ‘‘साहेब, आपणांस आमच्या राणीने स्मरण केलेले आहे.’’ करूणामय साहेबांनी म्हटले की, ‘‘राणीने मला का स्मरण केले? माझा अन् राणीचा काय संबंध?’’ दासीने सर्व हकीकत सांगितली. करुणामय (कबर) साहेबांनी म्हटले की, ‘‘राणीला आवश्यकता असेल तर तिने येथे यावे. मी येथे उभा आहे. मी तिथे गेलो अन् म्हणाली की, ‘तुला कोणी बोलवलं होतं. अथवा तिचा पती राजा सुद्धा काहीअपशब्द म्हटला तर? बेटी, संतांचा अनादर अत्यंत पापदायक ठरतो.’’ दासी पुन्हा परत आली. अन् राणीस सर्व वार्ता ऐकवली. तेव्हा राणीने म्हटले की, ‘‘दासी, माझा हात पकड अन चल तिकडे’’. जाताच राणी इंदूमतीने दंडवत पणाम करुन प्रार्थना केली की, ‘हे परवरदिगार, मला असे वाटते की, आपणास खांद्यावर घेऊन बसावावं.’’ करुणामय साहेबजी म्हटले की, ‘‘हे मुली मी हेच पाहू इच्छित होतो की, तुझ्यामध्ये कोणती श्रद्धा आहे की अशीच उपाशी मरत आहेस?’’ राणीने आपल्या हाताने भोजन बनवीले. करूणामय रुपामध्ये आलेले कविर्देव म्हटले की, ‘‘मी भोजन करत नाहीं. हे माझे शरीर आहार भोजन करण्याचे नाही तेव्हा राणीने म्हटले की, ‘‘मी सुद्धा भोजन करणार नाही.’’ करूणामय साहेबजीं म्हणाले की, ‘‘ठीक आहे मुली, आण भोजन करतो.’’ कारण समर्थ त्यांस म्हटले जाते, जे इच्छील ते करील. करूणामय साहेबांनी भोजन केले. नंतर राणीस म्हणाले की ‘जी ही साधना तू करतेस ती तुला कोणी सांगितली आहे?’ राणी म्हटली की, ‘माझ्या गुरुदेवांनी हा आदेश दिलेला आहे.’ कबीर साहेबजी म्हणाले, ‘‘काय आदेश दिलेला आहे? तुझ्या गुरुदेवांनी?’’ इंद्रमतीने म्हणाले, ‘ब्रह्मा-विष्णु-महेश यांची पूजा एकादशी चे व्रत, तीर्थ भ्रमण, देवपुजा, श्राद्ध घालणे, मंदीरामध्ये जाणे, संतांची सेवा करणे इत्यादी.’’ करुणामय कबीर साहेब म्हणाले, ‘जी साधना तुला तुझ्या गुरुदेवांनी प्रदान केली आहे, त्याद्वारे तु जन्म अन मृत्यू तथा स्वर्ग-नर्क व ८४ लक्ष योनीमधील कष्टातून मुक्त होऊ शकत नाही.’ राणी म्हणाली की, ‘‘महाराजजी, जेवढेही संत आहेत, आपापली प्रभुता स्वत:च बनवून येतात. माझे गुरुदेवांच्या विषयी काहीही म्हणू नका. मी मुक्त होऊ-अथवा न होऊ’’.

तेव्हा करूणामय (कबीर) साहेबांनी विचार केला की, ‘‘ह्या भोळ्या जीवास कसं काय समजवायचे? त्यांनी जी शेपटी पकडलेली आहे त्या शेपटीस सोडू शकत नाहीत. मरू मात्र शकतात.’’ करूणामय साहेबजी म्हणाले की, ‘‘मुली तुझी काय इच्छा आहे. मी निंदा करत नाही. काय मी तुझ्या गुरुदेवांना अपशब्द (शिवी) बोललो अथवा वाईट बोललो का? मी तर भक्तीमार्ग सांगत आहे की, ही पुर्वीची भक्ती शास्त्राविरुद्ध आहे. तुला पार (मुक्त)

करणार नाही. अन् तुझा कोणताही येणारा कर्मदंड नष्ट करू शकणार नाही आणि ऐक, आजपासून तीसऱ्या दिवशी तुझा मृत्यू होईल. न तुझे गुरुदेव वाचवू शकतील, आणि न तुझी ही असत्य साधना वाचवू शकेल?'' (जेव्हा मरणाची वेळ येते, तेव्हा जीवास भिती वाटू लागते, तसे मानत नाहीत.) राणीने विचार केला कि, संत कधी असत्य बोलत नाहीत. परंतु असे नाही ना होणार की परवां मी खरच मरेन?'' ह्या भितीने तिने करूणामय साहेबांना विचारले की, ''साहेबजी काय माझा जीव (मृत्यू) वाचू शकतो?'' कबीर साहेब (करूणामय) यांनी म्हणाले, ''वाचू शकतो, जर तु माझ्याकडून उपदेश घेशील, माझी शिष्या बनशील. पूर्वीच्या सर्व पूजा त्यागशील तेव्हाच तुझा जीव वाचू शकतो.'' इंद्रमतीने म्हटले की, ''मी ऐकले आहे की गुरुदेव बदलू नये. कारण त्याने पाप लागते. कबीर साहेबांनी (करूणामय) म्हटले की, ''नाही पुत्री, हा ही तुझा भ्रम आहे. एक वैद्या (डॉक्टर) कडून औषधांचा गुण न आल्यास, आपण दुसऱ्या डॉक्टरांकडून औषध घेत नाही कां? एक पाचवी इयत्तेचा अध्यापक असतो. नंतर एक उच्च इयत्तेचा अध्यापक असतोस ना. पुत्री, पुढील इयत्तेमध्ये जावे लागते. काय सर्व आयुष्य पाचवी इयत्तेमध्येच व्यतीत करशील कां? त्यासही सोडावे लागेल. आता तू पुढील शिक्षण (अभ्यास) घे. मी शिकवण्यासाठी आलेलो आहे.'' तरीही ती मानली नसती. परंतु मृत्यू दृष्टांत झाल्यावर तिला वाटले की, ''संत म्हणत आहे तर काही बिघडू नये.'' असा विचार करून इंद्रमतीने म्हटले की, 'जसे आपण म्हणता तसेच मी करेन.' करूणामय (कबीर) साहेबजींनी तिला उपदेश प्रदान केला अन् म्हटले, ''तिसऱ्या दिवशी, माझ्या रुपामध्ये काळ येईल. तू त्याच्याबरोबर संभाषण करू नकोस, मी जे नाम (गुरुमंत्र) दिलेला आहे त्याचा दोन मिनीटांपर्यंत जाप कर. दोन मिनिटांनंतर त्यास पहा. त्यानंतर सत्कार कर. तसे तर गुरुदेव येताच अतिशीघ्र चरणांमध्ये पडून दंडवत प्रणाम करणे अत्यावश्यक असते. हा केवळ माझा ह्यावेळचा आदेश आहे.'' राणी म्हटली की, '''ठीक आहे साहेबजी.''

आता राणीस चिंता लागून राहीली होती. श्रद्धेने ती जाप करत होती. करूणामय (कबीर) साहेबजींचे रुप धारण करून गुरुदेवांच्या रूपामध्ये काळ आला. त्याने आवाज दिला, 'इन्द्रमति, इन्द्रमति' आता तिला पहिल्यापासूनच भिती होती ती नाम जाप करत राहिली. काळाच्याकडे तिने पाहिले नाही. दोन मिनिटानंतर जेव्हा पाहिले तेव्हा काळाचे स्वरुप बदलले काळाचा वास्तविक चेहरा दिसू लागला. करूणामय साहेबांचे स्वरुप राहिले नाही. जेहा काळाने पाहिले की, त्यांचे तर स्वरूप बदलून गेलेले आहे. तेव्हा त्याला समजले की, हिच्या (इन्द्रमति) जवळ कोणता तरी शक्तीयुक्त मंत्र आहे. काळ म्हटला की, ''तुला नंतर पाहून घेईन. आता तर वाचलीस.'' असे म्हणून काळ निघून गेला. राणी अत्यंत खुश झाली. आपल्या दासीस म्हणू लागली, ''माझा मृत्यू होणार होता. माझ्या



गुरुदेवांनी मला वाचवले.'' राजाजवळ जाऊन म्हटली की, ''आज माझा मृत्यू होणार होता. माझ्या गुरुदेवांनी माझी रक्षा केली. मला नेण्यासाठी काळ आलेला होता.'' राजा म्हणाला की, ''तु अशीच काहीतरी नाटके (स्वप्ने) रंगवत असतेस. काळ आला असता तर तुला काय तो सोडून गेला असता? हे संत तर नुसते बहकून देतात.'' आता ह्या गोष्टीस तो राजा कसा काय मानणार? आनंदाने राणी झोपली. काही वेळाने सर्प बनून काळ पुन्हा आला. अन् राणीस डंसला, लगेच राणीला समजले अन् ती किंचाळली , ''मला सापाने चावले'' सर्व नोकर पळत आले. पाहता पाहताच एका मोरी मधल्या छिद्रातून साप निघून गेला. आपल्या गुरुदेवांना पुकारून राणी बेशुद्ध झाली. करूणामय (कबीर) साहेब तेथे लगेच प्रकट झाले. लोकांना दाखवण्यासाठी त्यांनी मंत्र उच्चारला. (ते तर विना मंत्राचेच जीवीत करू शकतात, त्यांना कोणत्या तंत्र-मंत्राची आवश्यकता नाही.) इंद्रमतीस जीवीत केले. राणीने अत्यंत कृतज्ञतेने मनभावी आभार मानले की, ''हे बंदी छोड, जर आज मी आपल्या शरणामध्ये नसते तर माझी मृत्यू अवश्य झाला असता.'' साहेबजींनी म्हटले, ''इन्द्रमति, ह्या काळास मी तुझ्या घरी घुसुनही दिले नसते. तुझ्यावर ह्या काळाने सर्परुपाने हल्ला सुद्धा केला नसता. परंतु तुला विश्वास पटला नसता. तूला वाटले असते की, ''तुझ्यावर कोणती आपत्तीच आली नाही. तू असा विचार केला असतास की, ''गुरुजींनी मला बहकवून फसवून नाम उपदेश दिलेला आहे. म्हणूनच तुला थोडासा झटका दाखविला. नाही तर मुली, तुला विश्वास झाला नसता.''

**''धर्मदास यहाँ घना अंधेरा, बिन परचय जीव जम का चेरा।।''**

कबीर साहेब (करूणामय) यांनी म्हटले की, ''आता जेव्हा, मी इच्छेल तेव्हाच तुझा मृत्यू होईल. ''

गरीबदासजी म्हणतात की,

**''गरीब, काल डरै करतारसे, जय जय जय जगदीश ।**
**जौरा जौरी झाड़ती, पग रज डारे शीश ।।**

हा काळ, कबीर भगवान (कबीर परमेश्वर) यांना घाबरतो तर मृत्यू कबीर साहेबजींच्या पायातील पादत्राणे (बूट) झाडते. अर्थात नोकरतुल्य आहेत. नंतर पादत्राणांच्या धुळीस आपल्या मस्तकी लावून म्हणते की, 'साहेबजी आपण कोणास मरण्याचा आदेश द्याल त्याच्या जवळ जाईल. अन्यथा नाही जाणार''.

**गरीब, काल जो पीसै पीसना, जौरा है पनिहार।**
**ये दो असल मजूर है, मेरे साहेब के दरबार।।**

हा काळ जो येथील २१ ब्रह्मांडाचा भगवान (ब्रह्म) आहे तो ब्रह्म, विष्णु, महेश यांचा पिता आहे. हा तर माझ्या कबीर साहेबांचे दळण दळतो. अर्थात पक्का नोकर आहे.

अन् जौरा (मृत्यू) माझ्या कबीर साहेबजींचे पाणी भरते. अर्थात एक विशेष नोकरीण आहे हे दोन खरे मजूर माझ्या साहेबांच्या दरबारामध्ये आहेत.

काही दिवसांनतर साहेबजी (करूणामयजी) पुन्हा परत आले. अन् राणी इंद्रमतीस सतनाम प्रदान केले. नंतर काही कालावधीनंतर करूणामय साहेबांनी राणी इन्द्रमतीची अतीश्रद्धा पाहून 'सारनाम' दिले. शब्दांची उपलब्धी केली. जेव्हा साहेब जात होते, तेव्हा इन्द्रमति प्रार्थना करायची की, ''साहेबजी, माझ्या पतिराजास समजावून सांगा. मालक (स्वामी) ते सुद्धा मानतील. आपल्या चरणांमध्ये ते आल्यास माझे जीवन सफल होईल.'' तेव्हा चंद्रविजयाशी कबीर साहेबांनी प्रार्थना केली की, ''चंद्रविजय, आपणसुद्धा नाम घ्या, हे दोन दिवसांचे राज्य आणि थाट. नंतर चौऱ्याऐंशी लक्ष योन्यांमध्ये प्राणी जाऊन भ्रमण करेल.'' चंद्रविजय राजा म्हणाला की, ''भगवान, मी तर नाम घेणार नाही आणि आपल्या शिष्या इन्द्रमतिस विरोधही करणार नाही, जेवढे इच्छेल तेवढे खजिने दान करु दे. इच्छेल तसा संत्संग ती करू दे, मी काहीच नाकारणार नाही.'' कबीर साहेब (करूणामय) यांनी विचारले की, ''आपण नाम उपदेश का घेणार नाही?'' चंद्रविजय राजाने म्हटले की, ''मला मोठ मोठ्या राजाच्या मेजवानीमध्ये जावे लागते.'' करूणामय (कबीर) साहेबजी म्हटले की, ''मेजवाणीमध्ये जाण्याने नामास काय बाधा येईल? सभेत जा तेथे काजू खा, दुध प्या, सरबत (फळांचा रस) पिया. परंतु मद्यपानाचा प्रयोग करू नका. मद्यपान करणे, महापाप आहे.'' परंतु राजाने काहीच मान्य केले नाही.

राणीच्या प्रार्थनेवर करूणामय (कबीर) साहेबजींनी राजास समझवण्याचा प्रयत्न केला की, 'नामाशिवाय हे जीवन व्यर्थच जाईल. आपण नाम उपदेश घ्या'. राजाने पुन्हा सांगीतले की, ''गुरूजी नाम उपदेशासाठी काही मला सांगु नका. मी आपल्या शिष्येस त्यासाठी नाकारणार नाही. तिने कितीही दान करू दे, कितीही सत्संग करू दे.'' साहेबजी म्हटले, 'मुली, ह्या दोन दिवसांच्या सुखास पाहून ह्याची बुद्धी भ्रष्ट झालेली आहे. तू प्रभुंच्या चरणामध्यें लागू राहा. आपले कल्याण करून घे. येथे कोणी कोणाचे पति नाही. कोणी कोणाची पत्नी नाही. दोन दिवसांचा संबंध आहे. आपले कर्म बनव, मुली.'' इंद्रमति ८० वर्षाची वृद्धा झाली. कोठे ती ४० वर्षाच्या आयुष्यामध्ये मरणार होती. जेव्हा तिचे शरीर हलू लागले, तेव्हा करूणामय साहेबांनी म्हटले, ''आता बोल इंद्रमति, काय हवेय तुला? जाऊ इच्छिते का सतलोकास?'' इंद्रमति म्हटली, ''साहेब तयार आहे, आता पूर्णपणे तयार आहे.'' करूणामय साहेबांनी म्हटले की, ''तुझी तुझ्या नातू किंवा नातीविषयी कोणती मोह ममता तर नाही ना?'' राणी म्हटली, ''बिल्कूल नाही साहेबजी. आपण ज्ञानच असे निर्मळ प्रदान केले आहे की ह्या गलिच्छ लोकामध्ये (धामामध्ये) वास्तव्याची का इच्छा करू?'' कबीर साहेब (करूणामय)जी म्हटले की, ''चल मुली.''



राणी प्राण त्यागून गेली. साहेब कबीर (करूणामय) जी राणी इंद्रमतीच्या आत्म्यास वर घेऊन गेले. ह्याच ब्रह्मांडामध्ये एक मानसरोवर आहे. त्या मानसरोवरावर जाऊन या आत्म्यास स्नान करायचे असते. ह्याप्राण्यास तेथे साहेबजी काही कालावधी पर्यंत ठेवतात. तेथे तेव्हा करूणामय (कबीर) साहेबजींनी म्हटले की, ''आता पुन्हा सांग तुझी काही इच्छा आहे का? असेल तर पुन्हा जन्म घ्यावा लागेल. तर मनामध्ये इच्छा राहिली असेल तर सतलोकामध्ये जाऊ शकत नाही. इंद्रमतिने सांगितले, ''साहेब, आपण तर अंतर्यामी आहात. कोणतीची इच्छा नाही. आपल्या चरणांची इच्छा आहे. परंतु मनामध्ये एक शंका निर्माण झालेली आहे की, माझ्या पतिने मला कोणत्याही धार्मिक कर्मास कधी नाकारले नाही. अन्यथा आजकालचे पति आपल्या पत्निस यास बाधा करत असतात. जर त्यांनी मला विरोध केला असता तर मी आपल्या चरणांमध्ये लागू शकले नसते. माझे आत्मकल्याणही झाले नसते. त्यांच्या ह्या शुभकर्मामधील सहयोगाचा काही लाभ त्यांना मिळत असेल तर कधी त्यांच्यावर ही दया करा दाता.'' आता साहेबर्जीनी पाहिले की, ही मूर्ख तिच्या पतीच्या मागे परत लटकलेली आहे. साहेब म्हटले, ''ठीक आहे मुली आणखी तू दोन-चार वर्ष येथेच वास्व्यव्य कर.''

पुढे दोन वर्षानंतर राजाही मरणास टेकला. कारण त्याने नाम उपदेश घेतला नव्हता. यमाचे दूत आले. राजा चौकांमध्ये चक्कर येऊन पडला. यमाच्या दूतांनी त्याचा गळा दाबला. राजाने मल-मूत्राचे विसर्जन केले. करूणामय (कबीर) साहेबांनी राणीस म्हटले की, ''पाहा तुझ्या राजाचे काय हाल (स्थिती) होत आहे.'' तेथून साहेबांनी दाखविले. तेव्हा राणीने म्हटले की, ''दाता, जर त्यांच्या माझ्या भक्ती मधील सहयोगाचे कोणते तरी फळ त्यास प्राप्त होत असेल तर दया करा.'' राणी मध्ये पुन्हा थोडीशी ममता बनली. साहेब कबीर (करूणामय)जींनी विचार केला की, ''ही पुन्हा काळजाळ्यामध्ये फसेल.'' असा विचार करून कबीर (करूणामय) साहेबजी मानसरोवरातून ते राजा चंद्रविजय जेथे आपल्या महालामध्ये अचेत (बेशुद्ध) पडला होता त्या स्थानी गेले. कबीर साहेबजींच्या येताच, यमदूत जसे मृतापासून गिधाडे उडून जातात तसे आकाशात उडून गेले चंद्रविजय शुद्धीवर आला. समोर करूणामय साहेबजी उभे होते. केवळ चंद्रविजयास दिसत होते. अन्य कोणासही दृष्टीस येत नव्हते. चंद्रविजय चरणांमध्ये पडून याचना करू लागला की, ''मला क्षमा करा, दाता, माझा जीव वाचवा.'' कारण आता त्याने पाहिले की त्याचा जीव जाणार आहे. (जेव्हा ह्या जीवाचे नेत्र उघडतात तेव्हा समजते की आपले सर्व चुकले, बिघडले.) राजा पुन्हा पुन्हा म्हणू लागला की, ''मला क्षमा करा दाता, माझा जीव वाचवा, मालक, स्वामी.'' कबीर साहेबजींनी म्हटले, ''राजा आजही तेच सांगतोय, त्या दिवशी ही तेच सांगितले होते. नाम उपदेश घ्यावा लागेल.'' राजा म्हणाला, ''मी नामउपदेश घेईन, या क्षणीच घेईन.'' कबीरसाहेबजींनी नाम

उपदेश दिला. तथा सांगितले की, ''आता मी तुला दोन वर्षाचे आयुष्य देईन. जर यामधील एक श्वास जरी वाया गेला तर पुन्हा कर्मदंड भोगावे लागेल.''

**कबीर, जीवन तो थोडा भला, जै सत् सुमरण हो। लाख वर्ष का जीवना, लेखे घरे ना को।।**

शुभ कर्मामध्ये सहयोग दिलेले पूर्वीचे कर्म अन् बरोबर श्रद्धेने दोन वर्षाचे स्मरण आणि तीन्ही नाम पदान करून कबीर साहेब (करुणामयजी) यांनी, चन्द्रविजयास पार (मुक्त) केले. बोला सतगुरु देव की जय ''जय बन्दी छोड!''

परमेश्वर कबीर साहेबजी खऱ्या (सत्य) श्रद्धाळूंची आयु वृद्धींगत करतात, अन् त्यांच्या परीवाराचेही रक्षा करतात. उपरोक्त विवरणाने हे सिद्ध झाले. ही प्रमाणे फार पूर्वीची आहेत. वर्तमानामध्ये साधारण व्यक्ती विश्वास करत नाहीत, वर्तमानामध्ये पूज्य कबीर परमेश्वरांच्या शक्तीने संतगुरु रामपालजी द्वारे झालेले कष्ट निवारण आणि आयुवृद्धीचे भरपूर उदाहरणे/प्रमाण ह्याच पुस्तकात ''भक्ति सौदागरास संदेश'' मध्ये सत्य भक्तीचा भ्रमीतांना मार्गविषय या लेखात वाचावे.

## कबीरसाहेब (कविर्देव) यांचे कलियुगामधील अवतार.

विक्रमी संवत् १४५५ (सन १३९८) जेष्ठ महिन्याची पौर्णिमेला प्रांत ब्रह्म मुहर्तावर ते पूर्ण परमेश्वर कबीर साहेब (कविर्देव) स्वयं आपल्या मूळस्थान सतलोकातून आले. काशी मध्ये 'लहरतारा' नावाच्या तलावातील कबळांच्या फुलावर एक बालकाचे रूप धारण करून प्रकट झाले. प्रथमत: मी आपणांस नीरू-नीमा यांच्या विषयी सांगू इच्छितो की, हे कोण होते?

नीरू आणि नीमा दोघे गौरीशंकर आणि सरस्वती नावाचे ब्राम्हण होते . ते भगवान शिवाचे उपासक होते. भगवान शिवाची महिमा 'शिवपुराणामधुन' निस्वार्थभावाने भक्तांना ऐकवायचे. कोणाकडूनही धन घेत नव्हते. एवढे पवित्र आत्मा होती की, जर कोणी त्यांना स्वत:हून दक्षिणा दिली, तर त्यातली आपल्या भोजन योग्य ठेवत अन् उर्वरित धनाचा भंडारा करत होते. (द्वापर युगामध्ये नीरू-नीमा 'सुपच सुदर्शनचे' मातापिता होते. त्यांनी कबीर साहेबांचे म्हणणे स्वीकार केलेले नव्हते. शेवटी सुदर्शनने करूणामय रुपात आलेल्या कबीर साहेबांना प्रार्थना केली होती की, ''प्रभु, आपण मला उपदेशाद्वारे सर्व काही प्रदान केलेले आहे. आपणाकडून आजपर्यंत काही मागण्याची कोणती आवश्यकताच पडली नाही. कारण आपण सर्व मनोकामना पूर्ण केल्या आणि जे वास्तविक भक्तीधन आहे त्यामध्येही परीपूर्ण केले. एक प्रार्थना आहे की, दासजी! जर उचित वाटलं तर स्वीकार करा. परमात्मा माझे माता पिता जर कोणात्या जन्मामध्ये कधी मनुष्य शरीर प्राप्त करतील, तर त्यांना सांभाळा प्रभु. हे दोघेही फार पुण्यात्मा आहे. परंतु आज याची बुद्धी विपरीत झालेली आहे. हे परमात्म्याच्या वाणीस मानत नाहीत. कबीर साहेबजी म्हणाले, ''चिंता करू नकोस,



आता तू आपल्या माता पित्यांच्या मोहबंधनामुळे येथेच अडकशील. वेळ येइल तेव्हा यांनाही सांभाळून घेइल. काळ जाळ्यातून पार (मुक्त) करेल तू निश्चित होऊन सतलोकास जा. आणि सुदर्शनजी सतलोकामध्ये निघून गेले.

सुदर्शनचे तेच माता-पिताच्या कलायुगामधील नीरु-नीमाच्या जन्मापूर्वीही ब्राम्हण घरांमध्ये यांचे दोन जन्म झाले. त्यावेळीही नि:संतान च राहिले. नंतर तीसरा हा जन्म काशीमध्ये झाला. त्यावेळीही हे ब्राह्मण आणि ब्राह्मणी (गौरीशंकर अन् सरस्वती या नावाने) होते. संतान यावेळीही त्यांना नव्हती.)

अन्य स्वार्थी ब्राह्मण गौरीशंकर व सरस्वती यांच्याशी इर्षा करत होते. कारण, गौरीशंकर नि:स्वार्थ पणे कथा सांगत असायचे. पैशाच्या लालसेने भक्तांना भ्रमीत करत नव्हते. फसवत नसते. ज्या कारणाने प्रशंसेस पात्र बनलेले होते. तिकडे मुस्लीमांना यांच्याबरोबर कोणीही ब्राह्मण हिंदू नाही हे समजल्यावर त्यांनी याचा फायदा उठवला. गौरी शंकर व सरस्वती या दोघांनाही जबरदस्तीने मुसलमान बनवीले. मुस्लीमांनी आपल्या (घरातील)जल त्यांच्या सर्व घरामध्ये शिंपडले. तथा त्यांच्या वस्त्रांवर शिंपडले. त्यामुळे हिंदू ब्राह्मणांनी जाहिर केले की, आता हे मुस्लीम बनलेले आहेत आणि जाहिर केले की, आजनंतर यांचा आमच्याशी कोणतेच बंधुत्वाचे नाते राहणार नाही.

बिचारे गौरीशंकर आणि सरस्वती विवश झाले. मुस्लीमांनी पुरुषाचे (गौरीशंकरचे) नाव नीरु आणि स्त्री (सरस्वती) चे नाव नीमा असे ठेवले. पुर्वी त्यांच्याजवळ जी पूजा यायची. त्याने त्यांचा उदरनिर्वाह व्हायचा. अन् जे काही धन शिल्लक रहायचे त्याचा दुरुपयोग करत नव्हते. त्या शिल्लक राहिलेल्या धनाचा धर्म-भंडारा करत होते. आता पुजा यायचीही बंद झालेली होती. त्यांना प्रश्न निर्माण झाला की आता काय काम करायचे? त्यांनी एक वस्त्र विणायचा हातमाग आणला अन् विणायचे कार्य प्रारंभ केले. त्यावेळीही ते आपला उदरनिर्वाह करुन शिल्लक धनाचा भंडाऱ्यामध्ये उपयोग करत होते. हिंदू ब्राह्मणांनी नीरु-नीमा यांचे गंगा नदी मधील स्नान करणे बंद करून टाकले अन् म्हणायचे की, 'आता तुम्ही दोघे मुसलमान झाला आहात.''

गंगा नंदीचे जल लहरीद्वारे उसळून काशीमधील एक लहरतारा नावाच्या मोठ्या सरोवरास भरून ठेवले होते. त्यामधे कमळपुष्पे उगवली होती. सन १३९८ (विक्रमी संवत १४५५) जेष्ठ मास (महिना) शुद्ध पौर्णिमेला ब्रह्ममुहूर्तास (सुर्योदयाच्या $१^{१}/_{२}$ तास पूर्वी साधारणपणे) आपल्या सतलोक (ऋतूधाम) तून सशरीर येऊन परमेश्वर, कबीर (कविर्देव) बालकरुप बनवून 'लहरतारा' तलावातील कमळाच्या पुष्पावर विराजमान झालेत. त्याच 'लहरतारा' तलावावर नीरू-नीमा पहाटे ब्रम्हमुहूर्तावर स्थान करण्यासाठी जात होते. एक अत्यंत तेजपूंज चमकणारा गोळा (बालक रुपामधील परमेश्वर कबीर साहेबजी तेजोमय शरीर

युक्त आले होते. दुर अंतरामुळे प्रकाश पुंजच दिसत होते). वरून (सत्यलोकातून) आला अन् कमळाच्या पुष्पावर सिमटला. त्यामुळे सर्व 'लहरतारा' तलाव जगमगीत (अत्यंत प्रकाशीत) झाला आणि नंतर एका कोपऱ्यामध्ये जाऊन अदृश्य झाला. या दृश्यास स्वामी रामानंदजीचे शिष्य 'ऋषि अष्टानंद जी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहत होते. अष्टानंदजी सुद्धा स्नान करण्यासाठी एकांत स्थानी प्रतिदिन जात असत. तेथे बसून आपली साधना गुरुदेवांनी जो मंत्र दिलेला होता, त्याचा जाप करत असत आणि निसर्गाचा आनंद घेत असत. स्वामी अष्टानंदजीनी जेव्हा पाहिले की, ''एवढा तेजमय प्रकाश, ज्याने नेत्रही दिपून गेले. तेव्हा त्यांना वाटले की, ही कोणती माझ्या भक्तीची उपलब्धी आहे अथवा माझा धोका (दृष्टीभ्रम) आहे असा विचार करून त्यासंबंधी जाणून घेण्यासाठी ते आपल्या गुरुदेवांजवळ गेले.

आदरणीय रामानंदजीना अष्टानंदजीने विचारले की, ''हे गुरुदेव आज मी असा तेजमय प्रकाश पाहिला की जिवनामध्ये कधीही पाहिला नाही.'' त्यांनी सर्व वृत्तांत सांगितला, ''आकाशामधून एक प्रकाश समुह येत होता. मी पाहिले असता, माझे नेत्र त्या तेजस्वी प्रकाशास सहन करू शकले नहीत. त्यामुळे नेत्र बंदच झालेत. मिटलेल्या नेत्रांमध्ये एक शिशुरुप दृष्टीस आले. (जसे सुर्याकडे पाहिल्यांतर सुर्याचा केवळ एक गोलच दिसतो, असेच बालक दिसत होते.) काय ही माझ्या भक्तीची कोणती उपलब्धी आहे. अथवा माझा दृष्टिभ्रम होता?'' स्वामी रामानंदजी म्हटले की, ''पुत्र, असे लक्षण जेव्हा होते तेव्हा वरील लोकांमधून कोणी अवतार घेतात. ते कोणाच्या येथे प्रकट होतील, कोणा मातेच्या उदरात जन्म घेतील अन् नंतर आपल्या लीला करतील. (कारण ह्या ऋषींना एवढे ज्ञान आहे की, मातेपासूनच जन्म होतो.) तेवढे ऋषी रामानंदजींना ज्ञान होते. ते सर्व सांगून आपल्या शिष्याच्या शंकेचे समाधान केले.

नीरू व नीमा, त्या दिवसी स्नान करण्यासाठी जात होते. मार्गामध्ये नीमाने प्रभुस प्रार्थना केली कि, ''हे भगवान शिव, (कारण ते जरी मुस्लीम झाले होते तरीही एवढ्या वर्षांपासून करत असलेली आपली पूर्वीची भक्तीसाधना हृदयापासून विसरले नव्हते.) काय आपल्या घरी, आमच्यासाठी एका बालकाची कमतरता पडलेली आहे? आम्हास ही एक लाल (बाळ) दिले असते तर आमचे जीवन सुद्धा सफल झाले असते'' असे म्हणून हुंदके देत देत रडू लागली. तिच्या पती नीरुने म्हटले, ''प्रभुच्या इच्छेवर प्रसन्न राहिल्यानेच हित होते. जर अशी रडत राहीलीस तर तुझे शरीर कमजोर होईल. नेत्रांनी दिसणेही बंद होईल. आपल्या भाग्यामध्येच संतान नाही.'' असे म्हणत म्हणत 'लहरतारा' तलावावर पोहोचले. अद्याप थोडासा अंधार होता. नीमा स्नान करून बाहेर आली. आपली वस्त्र तिने बदलली. नीरू स्नान करण्यासाठी तलावामध्ये प्रवेश करून, स्नान करू लागला. नीमा जेव्हा स्नान करतेवेळी परिधान केलेले आधीचे वस्त्र धुण्यासाठी पुन्हा तलावाच्या किनारी गेली, तोपर्यंत



अंधार हटला होता. सुर्य उदय होणार होता. नीमाने तलावामध्ये पाहिले की, ''समोर कमळांच्या पुष्पांवर कोणती तरी वस्तु हालत आहे. कबीर साहेबजीनी बालक रुपामध्ये एका पायाचा अंगठा मुखामध्ये घेतला अन् एक पाय हलवत होते. प्रथमत: नीमाने विचार केला की, ''कोणतातरी सर्प तर नाही ना. माझ्या पतीकडे येत तर नाही ना''. नंतर पाहिले की, 'हे तर कोणते तरी चिमुरडे बालक आहे. ''बालक! अन् कमळाच्या फुलावर!'' एकदम तिने आपल्या पतीस आवाज दिला की, ''अहो पहा, बालक बुडेल, बालक बुडेल.'' नीरु म्हणाला ''तू बाळाच्या चक्करेमध्ये वेडी झाली आहेस. पाण्यामध्येही तुला बालक नजर येऊ लागले.'' नीमाने म्हटले, ''त्या समोरच्या कमळाच्या पुष्पावर पहा.'' आता तिच्या जोरदार आवाजाने प्रभावीत होऊन ज्या दिशेकडे हाताने इशारा केला होता. नीरुने तिकडे पाहिले. एक बालक कमळाच्या पुष्पावर नवजात शिशु रुपामध्ये झोपले होते. नीरुने त्या बालकास फुलासमवेत उचलून आणले. अन् नीमास दिले आणि स्वयं स्नान करू लागला. नीरू स्नान करुन बाहेर आला. नीमा बालक रुपामधील झालेल्या परमेश्वरास फार प्रेम करत होती. गदगद् स्वरात शिव प्रभुची प्रशंसा आणि स्तूती करत होती की, ''हे प्रभु, आपण माझी अनेक वर्षांची मनोकामना पूर्ण केलीत. (कारण की, ती शिवाची पूजारीण होती). आजच हृदयाने पुकारले होते. अन् आजच तु ऐकले. माझी मनोकामना पूर्ण केली.''

त्या कबीर परमेश्वरास ज्यांचे नाम केवळ घेतल्याने आपल्या हृदयामध्ये एक विशेष हलचल होऊन त्यांच्या प्रेमाने रोम रोम उभे होतात, आत्मा भरुन येतो. तर जिने त्यांना छातीशी कवटाळून पुत्रवत प्रेम केले असेल, तेव्हा त्या मातेला होणारा आनंद किती अवर्णनीय असेल. जशी माता प्रेम करते तशी ती कधी मुखाचा मुका, कधी छातीशी कवटाळत अन नंतर वारंवार त्या बालकाचे (कबीर साहेबांचे) मुख निरखत होती. इतक्यातच नीरू स्नान करून बाहेर आला. (कारण की, मनुष्य समाजाकडे अधिक लक्ष देत असतो.) निरुच्या मनामध्ये अचानक विचार आला की, ''अद्याप मुस्लिमांशी आपले विशेष स्नेह जुळलेले नाही आणि हिंदू ब्राह्मण आपला द्वेष करतात. प्रथमत: याचाच फायदा मुस्लीमांनी उठवून आम्हांस मुसलमान बनवीले. कारण आमचा कोणी सोबती नाही. आता जर आपण ह्या बालकांस घेऊन जाऊ तर लोक म्हणतील की, सांगा ह्या बालकाचे माता-पिता कोण आहेत? तूम्ही कोणाचे बाळ चोरून आणले आहे? याची माता रडत असेल. आपण काय जबाब द्यायचा, कसे काय सांगायचे? कमळाच्या पुष्पावर होते, असे सांगितले तर कोणी मानणार नाही.''

हा सर्व विचार करून नीरूने म्हटले की, ''नीमा या बालकास येथेच सोडून दे.'' नीमा म्हणाली की, ''मी ह्या बाळास सोडणार नाही. माझे प्राण जाऊन, मी तडफडून मरून जाईन. काय माहिती, माझ्यावर ह्या बाळाने काय जादू केलेली आहे? मी कदापी सोडणार

नाही.'' नीरूने आता सर्वगोष्टी समजावल्या की, आपल्याबरोबर असे होऊ शकते. नीमाने म्हटले की, ''ह्या बालकासाठी मी देश (गाव) सोडून जाणेही स्वीकारू शकते. परंतु यास सोडणार नाही.'' नीरूने तिची मुर्खता पाहून विचार केला की, ''ही तर वेडी झालेली आहे. समाजासही पाहत नाही.'' नीरूने नीमास म्हटले की, ''मी आजपर्यंत तुझ्या कोणत्याही म्हणण्याची (गोष्टीची) अवहेलना केलेली नाही. कारण आपल्याला बाळ नव्हते. जे तू म्हणायची ते मी स्वीकार करत राहिलो. परंतु आज मात्र मी तुझीही बाब कदापी मानणार नाही. एकतर ह्या बालकास येथे ठेवून दे. नाहीतर तुला लगेच दोन थोबाडीत देईन.'' त्या महापुरुषाने प्रथमत: आपल्या पत्नीच्या दिशेने हात उगारला होता. त्याचवेळी शिशुरुपामधील कबीर साहेब (कविर्देव) म्हटले की, ''नीरु, मला तुझ्या घरी घेऊन चल. तुझ्यावर कोणतीच आपत्ती येणार नाही.'' शिशु रुपामधील परमेश्वराचे वचन ऐकून नीरू भयभीत झाला की, ''हे बालक, कोणी फरिश्ता (महान पुरुष) अथवा कोणी सिद्ध पुरुष तर नाही ना! अन् माझ्यावर त्यामुळे कोणती आपत्ती येणार नाही ना?'' असा विचार करून नीरू गप्प राहून चालू लागला.

जेव्हा बालकास घेऊन घरी आले तेव्हा त्यास पाहून सर्वजण बालकास कोठून आणले असे विचारायचे विसरून गेले. काशीचे स्त्री व पुरुष सर्व जण बालकास पाहण्यास आले. तथा म्हणू लागले की, ''हे बालक तर कोणी देवता दिसतेय. एवढे सुंदर शरीर, असे तेजोमय बालक पुर्वी कधीही आम्ही पाहिलेले नाही. कोणी म्हणायचे की, हा तर ब्रह्मा, विष्णू, महेश यामधील कोणी प्रभु आहे. लोक म्हणू लागले, ''हे बालक, तर कोणी वरील लोकांतून आलेली शक्ती आहे.'' असे सर्व आपले-आपले मत व्यक्त करत होते.

**गरीब, चौरासी बंधन कटे, कीनी कलप कबीर। भवन चतुरदश लोक सब, टूटे जम जंजीर ।।३७६।।**
**गरीब, अनंत कोटि ब्रह्मांड में, बंदी छोड कहाय। सो तौ एक कबीर हैं, जननी जन्या न माय।।३७७।।**
**गरीब, शब्द स्वरूप साहिब धनी, शब्द सिंध सब माँहि। बाहर भीतर रमि रह्या, जहाँ तहां सब ठांहि।।३७८।।**
**गरीब, जल थल पृथ्वी गगन में, बाहर भीतर एक। पूरणब्रह्म कबीर हैं, अविगत पुरूष अलेख।।३७९।।**
**गरीब, सेवक होय करि ऊतरे, इस पृथ्वी के माँहि। जीव उधारन जगतगुरू, बार बार बलि जांहि।।३८०।।**
**गरीब, काशीपुरी कस्त किया, उतरे अधर अधार। मोमन कूं मुजरा हुवा, जंगल में दीदार।।३८१।।**
**गरीब, कोटि किरण शशि भान सुधि, आसन अधर बिमान। परसत पूरणब्रह्म कूं, शीतल पिंडरू प्राण।।३८२।।**
**गरीब, गोद लिया मुख चूंबि करि, हेम रूप झलकत। जगर मगर काया करै, दमकैं पदम अनंत ।।३८३।।**
**गरीब, काशी उमटी गुल भया, मोमन का घर घेर। कोई कहैं ब्रह्मा, विष्णु है कोई कहै इन्द्र कुबेर।।३८४।।**
**गरीब, कोई कहै छल ईश्वर नहीं, कोई किंनर कहलाय। कोई कहै गण ईश का, ज्यूं ज्यूं मात रिसाय।।३८८।।**
**गरीब, कोई कहै वरूण धर्मराय है, कोई कोई कहते ईश। सोलह कला सुभांन गति, कोई कहै जगदीश।।३८५।।**
**गरीब, भक्ति मुक्ति ले ऊतरे, मेटन तीनूं ताप। मोमन के डेरा लिया, कहै कबीरा बाप।।३८६।।**



**गरीब, दूध न पीवै न अन्न भखै, नहीं पलने झूलंत। अधर अमान धियान में, कमल कला फूलंत।।३८७।।**
**गरीब, काशी में अचरज भया, गई जगत की नींद। ऐसे दुल्हे ऊतरे, ज्यूं कन्या वर बींद।।३८९।।**
**गरीब, खलक मुलक देखन गया, राजा प्रजा रीत। जंबूदीप जिहाँन में, उतरे शब्द अतीत।।३९०।।**
**गरीब, दुनी कहै योह देव है, देव कहत हैं ईश। ईश कहे पारब्रह्म है, पुरण बीसवे बीस।।३९१।।**

कबीर साहेबच अनादि परमगुरु आहेत. कबीर साहेबांनीच बह्मा, विष्णु, शिव इत्यादी देवतांना ऋषि, मुनी व संतांना वेळोवेळी आपल्या सतलोकातून येऊन नाम उपदेश प्रदान केला. आदरणीय गरीबदासजी महाराजांनी आपल्या वीणेमध्ये लिहलेले आहे की,

**आदि अंत हमरा नहीं, मध्य मिलावा मूल।**
**ब्रह्मा ज्ञान सुनाईया, धर पिंडा अस्थुल।।**
**श्वेत भूमिका हम गए, जहां विश्वम्भरनाथ ।**
**हरियम हीरा नाम दे, अष्ठ कमल दल स्वांति।।**
**हम बैरागी ब्रह्म पद, सन्यासी महादेव ।**
**सोहं मंत्रदिया शंकर कूं, करत हमारी सेव ।।**
**हम सुल्तानी नानक तारे, दादू कूं उपदेश दिया**
**जाति जुलाहा भेद न पाया, काशी माहे कबीर हुआ ।**
**सतयुग में सत सुकृत कहैं टेरा, त्रेता नाम मुनिन्द्र मेरा ।**
**द्वापर में करूणामय कहलाया, कलियुग में नाम कबीर धराया।।**
**चारों युगों में हम पुकारैं, कूक कह्या हम हेल रे।**
**हीरे मानिक मोति बरसें, ये जग चुगता ढेल रे ।।**

उपरोक्त वाणीने सिद्ध होते कि, कबीर परमेश्वरच अविनाशी परमात्मा आहेत. हेच अजर-अमर आहेत. हेच परमात्मा चारही युगामध्ये स्वयं येऊन आपला सत्यभक्ती मार्ग प्रदान करतात.



# ६. पूर्ण संतांची ओळख

चारही वेद, गीताजी (भगवद्गीता) इत्यादी पवित्र सद्ग्रंथामध्ये असे प्रमाण, (पुरावे) आढळतात की, जेव्हा जेव्हा धर्माची हानी होते व अधर्माची वृद्धि होते आणि वर्तमानातील खोटे संत, महंत व गुरुंद्वारा भक्तिमार्गाच्या स्वरूपास बिघडवले गेले आहे. त्यावेळी परमेश्वर स्वयं येऊन किंवा आपल्या परमज्ञानी संतास पाठवून सत्यज्ञानाद्वारे धर्माची पुन्हा स्थापना करतात. ते भक्तीमार्गास शास्त्रांनुसार समझवतात. त्यांची ओळख अशी असते की, वर्तमानातील धर्मगुरु त्यांचा विरोध करुन त्यांचे विरुध्द उभे राहून राजा व प्रजेस भ्रमीत करून त्यांच्यावर अत्याचार करवितात. कबीर साहेबजी आपल्या वाणीमध्ये म्हणतात की :-

**जो मम संत सत उपदेश दृढावै (बतावै) वाके संग सभि राड़ बढ़ावै ।**
**या सब संत महंतन की करणी, धर्मदास मैं तो से वर्णी ।**

कबीर साहेबजी, आपल्या प्रिय शिष्य धर्मदासजीना या वाणीमध्ये समजावत आहेत की, ''जो माझा संत सतभक्तीमार्ग सांगेल त्याच्यासोबत सर्व संत व महंत भांडणे (झुंज) करतील. हीच त्याची ओळख असेल.''

दुसरी ओळख तो संत सर्व धर्मग्रंथांचा पूर्ण जाणकार (माहितगार) ज्ञाता असेल याचे प्रमाण सद्गुरु गरीबदासजींच्या वाणीमध्ये

**''सतगुरु के लक्षण कहूं, मधरे बैन विनोद। चार वेद षट शास्त्र, कहै अठरा बोध।।''**

सतगुरु गरीबदासजी महाराज आपल्या वाणीमध्ये पूर्ण संतांची ओळख सांगत आहेत की, ते चारही वेद सहा शास्त्रे, १८ पुराणे आदी सर्व ग्रंथांचे पूर्ण जाणकार (ज्ञाता) असतील अर्थात त्यांतील सार काढून सांगतील. 'यजुर्वेद' अध्याय १९ मंत्र २५, २६ मध्ये लिहीलेले आहे की, वेदांच्या अधुऱ्या (अपुर्ण) वाक्यांना, अर्थात सांकेतिक शब्दांना व एक चतुर्थांश श्लोकांना पुर्ण करून विस्ताराने सांगतील व तीन वेळेची पूजा सांगतील. प्रात: पूर्ण परमात्म्याची पूजा, दुपारी विश्वातील देवतांचा सत्कार व संध्या आरती स्वतंत्रपणे सांगतील.
यजुर्वेद अध्याय १९ मंत्र २५

**सन्धिछेद : अर्द्ध ऋचैः उक्थानाम् रुपम् पदैः आप्नोति निविदः ।**
**प्रणवैः शस्त्राणाम् रूपम् पयसा सोमः आप्यते ।(२५)**

**अनुवाद :** जे संत (अर्द्ध ऋचैः) वेदांच्या अर्ध्य वाक्ये अर्थात सांकेतीक शब्दांना पूर्ण करून (निविदः) आपूर्ति/ पूर्णत्व करतात (पदैः) श्लोकाच्या चौथ्या भांगास अर्थात् आंशिक वाक्यांना (उकथानम्) स्त्रोत्रांच्या (रुपम्) रुपामध्ये (आप्नोति) प्राप्त करतात अर्थात् आंशिक विवरणास पूर्ण रुपाने समजतात व समजवतात (शस्त्राणाम्) जसे शस्त्रांना चालविणे जाणणारा त्यास (रुपम) पूर्ण रुपाने प्रयोग करतो. तसेच पूर्ण सन्त (प्रणवैः) औंकारो अर्थात ओम्-तत्-सत् मंन्त्राना पूर्ण रूपाने समजून व समजावून (पयसा) दूध व पाणी वेगळे करतात. अर्थात् जलरहित दूध असे तत्वज्ञान प्रदान करतात. ज्यामुळे (सोमः) अमर पुरुष अर्थात् अविनाशी परमात्म्यास (आप्यते) प्राप्त करवून देतो तो पूर्ण संत वेदांस जाणणारा असे संबोधले जातात.

**भावार्थ :** तत्वदर्शी संत तो असतो जो वेदांतील सांकेतीक शब्दांना पूर्ण विस्ताराने वर्णन करतात. ज्याने पूर्ण परमात्म्याची प्राप्ती होते. त्यांस 'वेद जाणणारा' असे संबोधले जाते.
'यजुर्वेद' अध्याय १९ मंत्र २६

**संन्धिछेद : आश्विभ्याम् प्रातः सवनम् इन्द्रेण ऐन्द्रम् माध्यन्दिनम् ।**
**वैश्वदैवम् सरस्वत्या तृतीयम् आप्तम् सवनम्। (२६)**

**अनुवाद :** ते पूर्ण संन्त तीन वेळेची साधना सांगतात (अश्विभ्याम्) सुर्याच्या उदय व अस्ताने बनलेल्या एका दिवसाच्या आधारावर (इन्देण) प्रथम श्रेष्ठतेने सर्व देवांचे स्वामी पूर्ण परमात्म्याची (प्रातः सवनम्) पुजा जर प्रात: काळी/सकाळी, करण्यास सांगतात जी पुजा (ऐन्द्रम) पूर्ण परमात्म्यासाठी असते. दुसरी (माध्यन्दिनम्) दिवसाच्या मध्यामध्ये (दुपारी) करण्यास सांगतात. जी पूजा (वैश्वदेवम्) सर्व देवतांच्या सत्कारासंधित (सरस्वत्या) अमृतवाणीद्वारा साधना करण्यास सांगतात आणि (तृतीयम) तीसरी (सवनम्) पूजा संध्याकाळी (आप्तम्) प्राप्त करवतात. अर्थात तिन्ही वेळच्या साधना वेगवेगळी करण्यास सांगतात. तेच जगताचे 'उपकारक संत' आहेत.

**भावार्थ : ज्या पूर्ण संताच्या विषयामध्ये मन्त्र २५ मध्ये म्हटले आहेत की, 'ते दिवसामधील ३ (तीन) वेळा प्रात:(दिवसाच्या मध्य-दुपारी आणि संध्या समयी) साधना करण्यास सांगतात. सकाळी तर पूर्ण परमात्म्याची पूजा मध्यान्हास (दुपारी) सर्व देवतांच्या सत्कारासाठी आणि संध्याकाळी 'संध्या आरती' आदीस अमृतवाणीद्वारे सांगतात तेच सर्व संसारावर उपकार करणारे संत असतात.**
'यजुर्वेद'-अध्याय १९ मंत्र ३०

**संधिछेद : व्रतेन दीक्षाम् आप्नोति दीक्षया आप्नोति दक्षिणाम् ।**
**दक्षिणा श्रद्धाम् आप्नोति श्रद्धया सत्यम् आप्यते (३०)**

**अनुवाद :** (व्रतेन) दुव्यर्सनांपासून दूर राहण्याचे व्रत ठेवल्याने अर्थात भांग,

मद्यपान, मांस आणि तम्बाखु आदींच्या सेवनावर संयम ठेवणारा साधक (दीक्षाम्) पूर्ण सन्ताकडून दीक्षा (आप्नोति) प्राप्त करतो. अर्थात तो पूर्ण संतांचा शिष्य बनतो. (दीक्षया) पूर्ण संत दीक्षित शिष्यापासून (दक्षिणाम्) दान (आप्नोति) प्राप्त करतात. अर्थात संत त्यांच्याकडून दक्षिणा घेतात जो त्यांच्याकडून नाम घेतो. अशा प्रकारे विधिवत (दक्षिणा) गुरुदेवद्वारा सांगितल्यानुसार जो श्रद्धेने दान (दक्षिणेने) धर्म करतो ज्यामुळे (श्रद्धाम्) श्रद्धेस (आप्नोति) प्राप्त होतो. (श्रद्धया) श्रद्धेने भक्ती केल्याने (सत्यम्) नित्य राहणारे सुख व परमात्मा अर्थात् अविनाशी परमात्म्यास (आप्यते) प्राप्त होतो.

**भावार्थ :** पूर्ण सन्त त्याच व्यक्तीस शिष्य बनवतात, जो सदाचारी राहील व अभक्ष्य पदार्थाचे सेवन व अंमली (नशा करणाऱ्या, मन उद्दीपक) पदार्थाचे सेवन न करण्याचे आश्वासन देतो. पूर्ण संत केवळ त्याच्याकडूनच दान ग्रहण करतात, जो त्यांचा शिष्य बनतो. नंतर गुरुदेवांकडून दीक्षा प्राप्त करून नंतर दान दक्षिणा करतो. त्याने श्रद्धा वाढते. श्रद्धेने सत्यभक्ति करण्याने अविनाशी परमात्म्याची प्राप्ति होते. अर्थात पूर्ण मोक्ष होतो. पूर्ण संत भिक्षा व देणगी(धन) मागत फिरत नाहीत.

**''कबीर, गुरु बिन माला फिरते गुरु बिन देते दान।**
**गुरु बिन दोनों निष्फल है पूछो वेद पुराण।।''**

तिसरी ओळख म्हणजे तीन प्रकारच्या मंत्रांना (नाम) तीन वेळा उपदेश करेल. ज्याचे वर्णन 'कबीर सागर ग्रंथ' पृष्ठ नं.२६५ ''बोध सागर'' या शिर्षकांतर्गत प्राप्त होते व पवित्र 'गीताजी' च्या अध्याय नं.१७ श्लोक २३ व सामवेद संख्या नं. ८२२ मध्ये प्राप्त होते.

कबीर सागर मध्यें अमरमूल बोध सागर पृष्ठ २६५

**तब कबीर अस कहेवे लीन्हा, ज्ञानभेद सकल कह दीन्हा।।**
**धर्मदास मैं कहो बिचारी, जिहिते निबहै सब संसारी ।।**
**प्रथमहि शिष्य होय जो आई, ता कहैं पान देहु तुम भाई।।१।।**
**जब देखहु तुम दृढ़ता ज्ञाना, ता कहैं, कहु शब्द प्रवाना।।२।।**
**शब्द मांहि जब निश्चय आवै, ता कहैं ज्ञान अगथ सुनावैं।।३।।**

पुन्हा एकवार समझावले आहे,

**बालक सम जाकर है ज्ञाना। तासों कहहू वचन प्रवाना।।१।।**
**जा को सूक्ष्म ज्ञान है भाई। ता को स्मरन देहू लखाई।।२।।**
**ज्ञान गम्य जा को पुनि होई।। सार शब्द जा को कह सोई ।।३।।**
**जा को होए दिव्य ज्ञान परवेशा, ताको कहे तत्व ज्ञान उपदेशा।।४।।**

उपरोक्त वाणीने स्पष्ट होते की, 'कडिहरि गुरु (पूर्णसंत) तीन स्थितीमध्ये सार नामा पर्यंत प्रदान करतात. तथा चौथ्या स्थितीमध्ये सारशब्द प्रदान करतात. कारण कबीर सागर



मधील प्रमाण तर नंतर पाहिले होते, परंतु उपदेश विधी पूर्वीच पूज्य दादा गुरुदेव अर्थात परमेश्वर कबीर साहेबर्जीनी आमच्या पूज्य गुरुदेवांस (सदगुरु रामपालजी महाराजांना) प्रदान केली होती. जे आम्हांस सुरुवातीपासूनच तीन वेळ नामदानाची दीक्षा देत आले आहेत.

आमचे गुरुदेव रामपालजी महाराज प्रथम वेळेला श्री गणेशजी, श्री ब्रह्मा-सावित्री, श्री लक्ष्मी-विष्णु, श्री शंकर-पार्वती व माता शेरांवाली यांचे नाम जप प्रदान करतात. ज्यांचा वास (निवास) आपल्या मानव शरीरामधील बनलेल्या चक्रांमध्ये असतो. 'मुलाधार' चक्रामध्ये श्री गणेश, 'स्वाद' चक्रामध्ये ब्रम्हा-सावित्रीचा वास, 'नाभि' चक्रामध्ये लक्ष्मी-पार्वतीचा वास, 'कंठ' चक्रामध्ये शेरावाली माता हीचा वास असतो. अन् या सर्व देवी देवतांचे आदि अनादि नाम मंत्र असतात. अर्थात ह्या मंत्राचे वर्तमानामधील गुरुंना ज्ञान नसते. हे चक्र उघडल्यानंतर मनुष्य भक्ति करण्या योग्य बनतो. सद्गुरु गरीबदास आपल्या वाणींमध्ये प्रमाण देतात कि;-

**पांच नाम गुझ गायत्री आत्म तत्व जगाओ।ॐ किलियं हरियम् श्रीयम् सोहं ध्याओ ।।**

**भावार्थ :** पाच नाम जे 'गुझ गायत्री' आहेत त्यांचा जप करून आत्म्यास जागृत करा. काही भोळे श्रद्धाळू म्हणतात कि, आमचे गुरुजी कुंडलिनी शक्ती जागृत करतात. त्यांना प्रार्थना आहे कि, कुंडलिनी शक्ती विना गायत्रीमंत्राने जागृत होऊ शकत नाही. ते केवळ भ्रमित करत आहेत.

दुसऱ्यावेळी, दोन अक्षरांचा जप देतात. ज्यामध्ये एक 'ओम' आणि दुसरा 'तत'(जे गुप्त आहे उपदेशीस सांगितले जाते) ज्याचा श्वासासोबत जप केला जातो.

तीसऱ्या वेळेस सारनाम देतात. जे कि पूर्ण रूपाने गुप्त आहे.

## तीन वेळेमध्ये नाम जपाचे प्रमाण

गीता अध्याय १७ चा श्लोक २३

**ॐ, तत्, सत्, इति, निर्देशः, ब्रह्मणः, त्रिविधः, स्मृतः,**
**ब्राह्मणाः, तेन, वेदाः, च, यज्ञाः, च, विहिताः, पुरा ।।२३।।**

**अनुवाद :** (ॐ) ब्रह्मचा (तत्) हा सांकेतिक मंत्र परब्रह्माचा (सत्) पूर्णब्रह्म चा (इति) असे हे (त्रिविधः) तीन प्रकारचे (ब्रह्मणः) पूर्ण परमात्म्याचे नाम सुमरणचा जपाचा (निर्देशः) आदेश/संकेत (स्मृतः) म्हटला आहे (च) आणि (पुरा) सृष्टिच्या आदि काळामध्ये (ब्राह्मणाः) विद्वानांनी सांगितलेले आहे (तेन) त्याच पूर्ण परमात्म्याने (वेदाः) वेद (च) आणि (यज्ञाः)धार्मिक क्रिया (विहिताः) करत होते.

संख्या नं.८२२ सामवेद उतार्चिक अध्याय ३ खंड नं.५ श्लोक नं.८

**(संत रामपालदास द्वारे भाषा भाष्य)**

**मनीषिभिः पवते पूर्व्यः कविर्नृभिर्यतः परि कोशां असिष्यदत्।**

**त्रितस्य नाम जनयन्मधु क्षरन्निन्द्रस्य वायुं सख्यास वर्धयन् ।।१८।।**

**मनीषिभिः-पवते-पूर्व्यः-कविर्-नृभिः-यतः-परि-कोशान्-असिष्यदत्-त्रि-तस्य-नाम-जनयन्-मधु-क्षरनः-न-इन्द्रस्य-वायुम्-सख्याय-वर्धयन्।**

**शब्दार्थ** :(पूर्व्यः) सनातन अर्थात् अविनाशी (कविर नृभिः) कबीर परमेश्वर मानव रुप धारण करून अर्थात गुरुरुपामध्ये प्रकट होऊन (मनीषिभिः) हृदयाने इच्छिणाऱ्या, श्रद्धेने भक्ती करणाऱ्या भक्तात्म्यांस (त्रि) तीन (नाम) मन्त्र अर्थात नाम उपदेश प्रदान करून (पवते) पवित्र करून (जनयन्) जन्म व (क्षरनः) मृत्यूपासून (न) रहित करतात आणि (तस्य) त्याच्या (वायुम्) प्राण अर्थात जीवन श्वासाना जो संस्कारवश गिणतीमध्ये टाकतो त्यास (कोशान्) आपल्या भंडाऱ्यातून (सख्याय) मित्रतेच्या आधारावर (परि) पूर्णरुपाने (वर्धयन्) वृद्धींगत करतात/वाढवतात. ज्या कारणाने (इन्द्रस्य) परमेश्वराच्या (मधु) वास्तविक आनंदास (असिष्यदत्) आपल्या आशिर्वाद प्रसादाने प्राप्त करून देतात.

**भावार्थ :** ह्या मंत्रामध्ये स्पष्ट केलेले आहे की, पूर्ण परमात्मा 'कविर' अर्थात 'कबीर' साहेब मानव शरीरामध्ये गुरु रूपात प्रकट होऊन प्रभु प्रेमींना तीन नामाचे जप (मंत्र) देऊन सत्यभक्ति करवतात आणि त्या मित्र भक्तास पवित्र करून आपल्या आशिर्वादाने पूर्ण परमात्म्याची प्राप्ती करवून देऊन पूर्ण सुख प्राप्त करवतात. साधकाचे आयुष्य वाढवतात. याचेच प्रमाण 'गीता' अध्याय १७, श्लोक २३ मध्ये आहे की, **'ओम्-तत्-सत् इति, निर्देश ब्रह्मण: त्रिविध्य स्मृत'** याचा भावार्थ असा आहे की, पूर्ण परमात्म्यास प्राप्त करण्याचे 'ॐ' (१), 'तत्' (२), 'सत्'(३) हे मंत्रजप स्मरण करण्याचा निर्देश देण्यात आला आहे. ह्या नामास तत्वदर्शी संताकडूनच प्राप्त करा. तत्वदर्शी संताविषयी गीता अध्याय ४, श्लोक नं.३४ मध्ये म्हटले आहे. तथा गीता अध्याय नं.१५, श्लोक नं.१ व ४ मध्ये तत्वदर्शी संतांची ओळख सांगितलेली आहे आणि म्हटले आहे की, तत्वदर्शी संतापासून तत्वज्ञान जाणून घेऊन त्या पश्चात त्या परमपद परमेश्वराचा शोध केला पाहिजे. जेथे गेल्यानंतर साधक परत पुन्हा ह्या संसारामध्ये येत नाही,अर्थात पूर्ण मुक्त होतो. त्याच पूर्ण परमात्म्यापासून संसाराची/जगाची रचना झालेली आहे.

**विशेष :** उपरोक्त विवरणाने स्पष्ट झाले आहे की, पवित्र चार ही वेद सुद्धा साक्षी आहेत की, पूर्ण परमात्माच पूजा योग्य आहे. त्यांचे वास्तविक नाव 'कविर्देव' (कबीर परमेश्वर) आहे आणि तीन मंत्रांच्या नामांचा जाप करण्यानेच पूर्ण मोक्ष प्राप्त होतो.

धर्मदासजींना तर परमेश्वर कबीर साहेबजींनी 'सारशब्द' देण्यासाठी मनाई केली होती कि, जर सार शब्द कोण्या काळाच्या दूताच्या हाती पडला तर मधल्या पिढीचे हंस पार होऊ शकणार नाहीत. जसे कलयुगाच्या अंतामध्ये अंतिम पिढीतील भक्त कृतघ्नी होतील. आणि आता वर्तमानामध्ये सन '१९४७' पासून भारत स्वतंत्र झाल्यानंतर मधली पिढी प्रारंभ



झालेली आहे. सन १९५१ मध्ये सतगुरु रामपालजी महाराजांना पाठविले आहे. आता सर्व भक्तजन शिक्षित आहेत. शास्त्र आपल्याजवळ विद्यमान (उपस्थित) आहेत. आता ही सतमार्ग-सतसाधना पुर्ण संसारामध्ये (जगतामध्ये) पसरेल आणि खोटे गुरु, संत, महंत लपून राहतील. यासाठीच 'कबीर सागर' 'जीव धर्मबोध' 'बोध सागर' पृष्ठ १९३७ वर

**''धर्मदास तोहि लाख दुहाई, सार शब्द कहीं बाहर नहीं जाई।**
**सार शब्द बाहर जो परि है, बिचली पीढी हंस नहीं तरि है।''**

पुस्तक ''धनी धर्मदास जीवन दर्शन एवं वंश परिचय'' च्या पृष्ठ ४६ वर लिहीलेले आहे कि अकराव्या पीढीस गादी प्राप्त झाली नाही. ज्या महंतजींचे नाव ''धीरज नामसाहब'' होते जे 'कवर्धा' येथे रहात होते. त्यानंतर १२ वे महंत 'उग्रनाम साहेब' यांनी 'दामाखेडा' येथे गादीची स्थापना केली आणि स्वत:च महंत बनून बसले. यापूर्वी दामाखेडा मध्ये गादी नव्हती. यावरुन हे स्पष्ट होते कि पूर्ण विश्वामध्ये सतगुरु रामपालजी महाराजांच्या अतिरिक्त वास्तविक भक्तिमार्ग नाही. सर्व प्रभु श्रध्दाधारकांना प्रार्थना आहे की, प्रभुंनी पाठवलेला 'दास' जाणून समझून आपले कल्याण करून घ्यावे.

**''यह संसार समझदा नाहीं, कहन्दा श्याम दोपहरे नूं।**
**गरीबदास यह वक्त जात है, रोवोगे इस पहरे नूं।।**

१२ व्या पंथाच्या (गरीबदास पंथ १२ वा पंथ म्हणून 'कबीरसागर' कबीर चरित्र बोध पृष्ठ १८७० वर लिहिलेले आहे.) विषयामध्ये 'कबीर सागर' कबीर वाणी पृष्ठ नं.१३६-१३७ वर वाणी लिहिलेली आहे की,

**सम्वत सत्रासै पचहत्तर होई, तादिन प्रेम प्रकटें जग सोई।**
**साखी हमारी ले जीव समझावै, असंख्य जन्म ठौर नहीं पावै।**
**बारवें पंथ प्रकट दै बानी, शब्द हमारे की निर्णय ठानी।**
**अस्थिर घर का मरमन पावैं, ये बारा पंथ हमही को ध्यावैं।**
**बारवें पंथ हम ही चलि आवैं , सब पंथ मेटि एक ही पंथ चलावे।**
**धर्मदास मोरी लाख दोहाई, सार शब्द बाहर नहीं जाई।**
**सार शब्द बाहर जो परही, बिचली पीढी हंसत नहीं तरहीं।**
**तेतिस अर्ब ज्ञान हम भाखा, सार शब्द गुप्त हम राखा।**
**मूल ज्ञान तब तक छुपाई,जब लग द्वादश पंथ मिट जाई।**

येथे साहेब कबीरजी आपल्या शिष्य धर्मदासजींस समझवतात किं, सन १७७५ मध्ये माझ्या ज्ञानाचा प्रचार होईल. जो की १२ वा पंथ होईल. बाराव्या (१२) पंथामध्ये आमची वाणी प्रकट होईल. परंतु योग्य भक्ति मार्ग होणार नाही. नंतर बाराव्या (१२ व्या) पंथामध्ये आम्ही स्वत:च चालून येऊ आणि सर्व पंथ नष्ट करून केवळ एकच पंथ चालवू.

परंतु धर्मदास तुला लाख शपथ आहेत कि हे ‘सार शब्द’ कोण्या कुपात्रास देऊ नकोस. अन्यथा मधल्या पिढीतील हंस (पवित्र आत्मे) मुक्त (पार) होऊ शकणार नाहीत. म्हणूनच जोपर्यंत १२ पंथ नष्ट होऊन एकच पंथ चालत नाही तोपर्यंत मी हे मूळ ज्ञान गुप्त ठेवीन.''

संत गरीबदासजी महाराजांच्या वाणीमध्ये नामाचे महत्व :-

**नाम अभैपद ऊंचा संतो, नाम अभैपद ऊंचा।**
**राम दुहाई साच कहत हूँ, सतगुरु से पुछा।**
**कहै कबीर पुरुष बरियामं्, गरीबदास एक नौका नांम॥**
**नाम निरंजन नीका संतों, नाम निरंजन नीका।**
**तीर्थ व्रत थोथरे लागे, जप तप संजम फीका॥**
**गज तुरक पालकी अर्था, नाम बिना सब दानं व्यर्था।**
**कबीर, नाम गहे सो संत सुजाना, नाम बिना जग उरझाना।**
**ताहि ना जाने ये संसारा, नाम बिना सब जम के चारा॥**

संत नानकसाहेबजींच्या वाणीमध्ये नामाचे महत्व :-

**नानक नाम चढ़दी कलां, तेरे भाणे सबदा भला।**
**नानक दु:खिया सब संसार, सुखिया सोय नाम आधार॥**
**जाप ताप ज्ञान सब ध्यान, षट शास्त्र सिमरत व्याख्यान।**
**जोग अभ्यास कर्म धर्म सब क्रिया, सगल त्यागवण मध्य फिरिया।**
**अनेक प्रकार किए बहुत यत्ना, दान पूण्य होमै बहु रत्ना।**
**शीश कटाये होमै कर राति, व्रत नेम करे बहु भांति॥**
**नहीं तुल्य राम नाम विचार, नानक गुरुमुख नाम जपिये एक बार ॥**

(परमपुज्य कबीरसाहेब (कविर देव) यांची अमृतवाणी)

**संतो शब्दई शब्द बखाना।। टेक॥ शब्द फांस फँसा सब कोई नहीं पहचाना॥ प्रथमहिं ब्रह्म स्वं ईच्छा ते पाँचौ शब्द उचारा। सोहं, निरंजन, रंरकार, शक्ति और ओंकारा॥ पाँचो तत्व प्रकृति तीनों गुण उपजाया। लोक द्वीप चारों खान चौरासी लख बनाया॥ शब्दइ काल कलंदर कहिये शब्दइ भर्म भुलाया॥ पाँच शब्द की आशा में सर्वस मूल गवांया॥ शब्दइ ब्रह्म प्रकाश मेंट के बैठे मूंदे द्वारा। शब्दइ निरगुण शब्दइ सरगुण शब्दइ वेद पुकारा। शुध्द ब्रह्म काया के भीतर बैठ करे स्थाना। ज्ञानी योगी पंडित औ सिध्द शब्द में उरझाना॥ पाँचई शब्द पाँच हैं मुद्रा काया बीच ठिकाना। जो जिहसंक आराधन करता सो तिहि करत बखाना। शब्द निरंजन चांचरी मुद्रा है नैनन के माँही। ताको जाने गोरख योगी महा तेज तप माँही॥ शब्द ओंकार भूचरी मुद्रा त्रिकुटी है स्थाना। व्यास देव ताहि पहिचाना चांद सूर्य तिहि जाना॥ सोहं शब्द अगोचरी मुद्रा भंवर गुंफा स्थाना। शुकदेव मुनी ताहि पहिचाना सुन अनहद को काना॥ शब्द रंरकार खेचरी मुद्रा दसवें द्वार ठिकाना॥ ब्रह्मा विष्णु महेश आदि लो रंरकार पहिचाना॥ शक्ति शब्द ध्यान उनमुनी मुद्रा बसे आकाश सनेही। झिलमिल झिलमिल जोत दिखावे जाने जनक विदेही॥ पाँच शब्द पाँच हैं मुद्रा सो निश्चय कर जाना। आगे पुरूष पुरान नि:अक्षर तिनकी खबर न जाना॥ नौ नाथ चौरासी सिध्दी लो पाँच शब्द में अटके। मुद्रा साध रहे घट भीतर फिर ओंधे मखु लटके॥ पाँच शब्द पाँच है मुद्रा लोक द्वीप यमजाला। कहैं कबीर अक्षर के आगे नि:अक्षर का उजियाला ॥**

जसे कि, ''संतो शब्दई शब्द बखाना'' या शब्दांमध्ये लिहिलेले आहे की, सर्व संतजन शब्दा (नामा)ची महिमा सांगतात. पूर्ण ब्रह्म कबीरसाहेबजींनी म्हटले आहे की, ‘शब्द सतपुरुषाचाही आहे जो की, ‘सतपुरुषांचे प्रतीक आहे व ज्योति निरंजन(काळ)याचे प्रतीक हा शब्दच (नाम) आहे. जसे शब्द ‘ज्योतिनिरंजन’ हा ‘चांचरी मुद्रा’ प्राप्त करवून देतो. त्यास गोरखनाथांनी अत्याधिक तपाने प्राप्त केले होते. जे कि सामान्य (साधारण) व्यक्तीच्या क्षमतेची गोष्ट नाही. अन् नंतर गोरखनाथ काळापर्यंतचीच साधना करुन सिद्ध बनले. परंतु मुक्त होऊ शकले नाही. जेव्हा कबीर साहेबांनी सत्यनाम तथा सारनाम प्रदान केले तेव्हा काळापासून मुक्तता(सुटका) गोरखनाथची झाली. म्हणूनच ‘ज्योति निरंजन’ नामाचे जाप करणारे काळजाळापासून सुटू (मुक्त होऊ) शकत नाहीत. शब्द ‘ओंकार’ (ओ३म्)चे जाप करण्याने ‘भूंचरी’ मुद्रेच्या स्थितीमध्ये साधक येतो. ज्याची साधना ‘वेद व्यासांनी’ केली. अन् काळजाळ्यातच राहिले. ‘सोहं’ नामाच्या जापाने ‘अगोचरी’ मुद्रेची स्थिति प्राप्त होते. अन् काळलोकामधील बनलेल्या भंवर गुफेमध्ये पोहचला जातो. ज्याची साधना ‘सुखदेव ऋषी’नी केली. अन् केवळ श्री विष्णुच्या लोकामधील बनलेल्या स्वर्गापर्यंतच पोहोचले गेले. शब्द ‘रंरकार’, ‘खैचरी’ मुद्रेस प्राप्त करवतो व दहाव्या द्वार (सुष्मणा) पर्यंत पोहोचले जाते. ब्रह्मा विष्णु महेश तीघांनी ‘रंरकार’ लाच सत्य मानून काळजाळामध्ये अडकून राहिले. शक्ति (श्रीयम्) शब्द हा ‘उनमनी’ मुद्रेस प्राप्त करवून देतो. ज्यांस राजा जनकाने प्राप्त केले. परंतु मुक्ती त्यांना प्राप्त झाली नाही. कित्येक संतांनी पाच नामामध्ये शक्तीच्या जागी ‘सत्यनाम’ जोडलेले आहे. जो की, ‘सत्यनाम’ कोणताच जाप नाही. हे तर सत्य (खऱ्या) नामाकडे ईशारा आहे. जसे सत्यलोकास ‘सच्चखण्ड’ (सत्यखंड) सुद्धा म्हटलेले आहे. अशाप्रकारेच ‘सत्यनाम’ व ‘सच्चा’ (खरे) नाम आहेत केवळ ‘सत्यनाम-सत्यनाम’ असा जाप करायचा नाही. ह्या पांच शब्दांची साधना करणारे नवनाथ व चौऱ्याऐंशी (८४) सिद्ध सुद्धा इथपर्यंत सीमीत राहीले आणि शरीरामध्ये (घटामध्ये) ध्वनी/आवाज ऐकूनच आनंद घेत राहिले. वास्तविक सत्यलोक स्थान तर शरीर (पिण्ड) पासून (अण्ड) ब्रह्मांडापासून पलिकडे (पार) आहे. त्यामुळेच नंतर ते सर्व मातेच्या गर्भामध्ये पुन्हा आले (उलटे लटकलेले) अर्थात् जन्म-

मृत्यूचे त्यांचे कष्ट समाप्त झालेले नाहीत. जी ही उपलब्धी (घट) शरीरामध्ये होते, ती तर काळ (ब्रह्म) पर्यंतच आहे. कारण पूर्ण परमात्म्याचे निज (स्वत:चे) वास्तवीक स्थान (सत्यलोक) आहे. त्यांच्याच शरीराचा प्रकाश तर परब्रह्म आदींच्या ही पेक्षा अधिक तथा अत्यंत पुढे (दूर) आहे. त्यासाठी तर पूर्णसंतच पूर्ण साधना सांगतील ती पांच नामा (शब्दां) पेक्षा भिन्न अशी आहे.

**संतों सो सत्गुरु मोहे भावै, जो नैनन अलख लखावै।।**
**ढोलत ढिगै ना बोलत बिसरै, सत उपदेश दृढावै।।**
**आंख ना मूंदै कान ना रुदैं ना अनहद उरझावै।**
**प्राण पूंज क्रियाओं से न्यारा, सहज समाधी बतावै।।**

'घटरामायणा'चे रचियता आदरणीय तुलसीदास साहेबजी हाथ रसवाले स्वयं म्हणतात कि: (घट रामायण प्रथम भाग पृष्ठ नं.२७)

**पाँचो नाम काल के जानौ तब दानी मत संका आनौ। सुरति निरत लै लोक सिधाऊँ। आदिनाथ ले काल गिराऊँ। सतनाम ले जीव उबारी, अस चल जाऊँ पुरुष दरबारी।।**
**कबीर, कोटि नाम संसार में, इनसे मुक्ति न हो। सार नाम मुक्ति का दाता, वाको जाने न कोए।।**

गुरुनानकजींच्या वाणीमध्ये तीन नामांचे प्रमाण :-

**पूरा सतगुरु सोए कहावै, दोय अखर का भेद बतावै।**
**एक छुड़ावै एक लखावै, तो प्राणी निज घर जावै।**
**जै पंडित तु पढ़िया, बिना दउ अखर दउ नामा।**
**परणवत नानक एक लंघाए, जे कर सच समावा।**
**वेद कतेब सिमरित सब सांसत, इन पढि मुक्ति न होई।।**
**एक अक्षर जो गुरुमुख जापै , तिस की निरमल होई।।**

**भावार्थ :** गुरुनानकजी महाराज आपल्या वाणीद्वारे समझावू इच्छितात की, पूर्ण सद्गुरु तेच असतात, जे दोन अक्षराच्या जापाविषयी जाणतात. ज्यातील एक काळ व माया यांच्या बंधनातून सोडवतो व दुसरे परमात्म्याचे दर्शन करविते. आणि तिसरे जे एक अक्षर आहे ते परमात्म्यास भेटवतो/प्राप्त करवतो/परमात्म्याशी एकरुप करते.

संत गरीबदास महारांजाच्या अमृतवाणीमध्ये श्वासाच्या नामाचे प्रमाण:-

**गरीब स्वांसा पारस भेद हमारा, जो खोजे सो उतरे पारा।**
**स्वांसा पारा आदि निशानी, जो खोजे सो होए दरबानी।**
**स्वांसा ही में सार पद, पद में स्वांसा सार।**
**दम देही का खोज करो, आवागमन निवार।।**
**गरीब, स्वांस सुरति के मध्य है, न्यारा कदे नहीं होय।।**



**सतगुरू साक्षी भूत कूं, राखो सुरति समोय।।**
**गरीब, चार पदार्थ उर में जोवै, सुरति निरति मन पवन समोवै।**
**सुरति निरति मन पवन पदार्थ (नाम), करो इक्तर यार।**
**द्वादस अन्दर समोय ले, दिल अंदर दीदार।**
**कबीर, कहता हूँ कहि जात हूं, कहूं बजा कर ढोल।।**
**स्वांस जो खाली जात है, तीन लोक का मोल।।**
**कबीर, माला स्वांस उस्वांस की, फेरेंगे निज दास।**
**चौरासी भ्रमे नहीं, कटै कर्म की फांस ।।**

गुरुनानकदेवजींच्या वाणीमध्ये प्रमाण :-

**चहऊं का संग, चहुऊं का मीत जामै चारि हटावे नित ।**
**मन पवन को राखै बंद, लहे त्रिकुटी त्रिवेणी संध।।**
**अखण्ड मण्डल में सुन्न समाना, मन पवन सच्चखण्ड टिकाना ।।**

पूर्ण सतगुरु तेच आहेत जे तीन वेळेमध्ये नाम प्रदान करतील आणि श्वाशोच्छवासाच्या क्रियेसह सुमिरणा(जप)ची पद्धत सांगतील. तेव्हाच जीवाचा मोक्ष संभव आहे. जसे परमात्मा सत्य आहे. जप, त्याचप्रमाणे परमात्म्याचा साक्षात्कार व मोक्ष प्राप्त करण्याची पद्धती ही देखील आदि अनादि व सत्य आहे, जी कधीही बदलत नाही. गरीब दासजी महाराज आपल्या वाणीमध्ये म्हणतात की:-

**भक्ति बीज पलटै नहीं, युग जांही असंख। सांई सिर पर राखियो, चौरासी नहीं शंक।**
**घीसा आए एको देश से, उत्तरे एको घाट। समझों का मार्ग एक है, मुर्ख बारह बाट।**
**कबीर भक्ति बीज पलटै नहीं, आन पड़ै बहु झोला। जै कंचन बिष्ठा परै, घटै न ताका मोल।**

पुष्कळ महापुरुष सत्यनामाविषयी जाणत नाहीत. ते मनमुखी नाम देतात ज्याने न सुख प्राप्ती होती किंवा न मुक्ति मिळते. कोणी म्हणतात की, तप, हवन, यज्ञ आदि करा व काही महापुरुष नेत्र, कर्ण आणि मुख बंद करून अंतर्ध्यान करण्याचे सांगतात. जे की, हे त्यांच्या मनमुखी साधनेचे प्रतीक आहे. परंतु कबीर साहेबजी, संतगरीबदास जी महाराज, गुरु नानकदेवजी आदी परमसंतानी हे सर्व कर्मकांड व्यर्थ ठरवले व या क्रियांना मनाई करून केवळ एक नाम जप करण्यास सांगितले आहे.

एक 'नॉस्ट्रॉडेमस्' नावाचा भविष्यवक्ता होऊन गेला. सुमारे चारशे वर्षापूर्वी त्याने भविष्यवाणी लिहिलेली व बोलली होती. ती सर्व आता सत्य ठरत आहे. त्याने म्हटले आहे कि, सन २००६ मध्ये एक हिंदू संत प्रकट होईल व संसारामध्ये (जगतामध्ये) त्याची चर्चा होईल. तो संत ना मुस्लीम असेल ना ईसाई (ख्रिश्चन) असेल. तर तो केवळ हिंदूच होईल. त्यांच्या द्वारा सांगितलेल्या भक्ती मार्ग सर्वाहून भिन्न तथा सांगितलेला भक्तीमार्ग सर्वाहून

भिन्न आणि तथ्यांवर आधारित असेल. त्यांस ज्ञानामध्ये कोणी पराजित करू शकणार नाही. सन २००६ मध्ये त्या संताची आयु ५० ते ६० वर्षाच्या दरम्यान असेल. (संत रामपालजी महाराजांचा जन्म ८ सप्टेंबर १९५१ मध्ये झाला. जुलै २००६ मध्ये संतजींची आयु ठीक ५५ वर्षे झालेली आहे. जी की भविष्यवाणी नुसार खरे आहे.) त्या हिंदू संताच्या अध्यक्षतेमध्ये सर्व संसार (जगता) मध्ये भारतवर्षाचे शासन होईल आणि त्या संताच्या आज्ञेने सर्व कार्य होतील. त्यांची महिमा अवकाशाच्याही वर होईल. नॉस्ट्रॉडेमसद्वारे सांगितलेला सांकेतिक ईशारा 'पूर्णसंत सदगुरु रामपालजी महाराज' यांच्याकडे आहे की जे, २००६ मध्येच विख्यात झाले. तरीही अज्ञानी लोकांनी वाईट टीका करुन प्रसिद्ध केलेले असले तरीही ह्या पूर्णसंतामध्ये कोणताही दोष नाही.

उपरोक्त लक्षणे जी सांगितलेली आहेत ते सर्व तत्वदर्शी संत रामपालजी महाराजांमध्ये विद्यमान आहेत.

**संसाररुपी उलटा वृक्ष**






# ७. संत विटंबनेची शिक्षा

आदरणीय गरीबदास साहेबजींचा जन्म पवित्र गाव - 'छुडानी, जिल्हा-'झज्जर' येथे श्री बलरामजी धनखड (जाट) यांचे घरी झाला. पूर्णब्रह्म 'कर्वीदेव' (कबीर साहेबजी काशीमध्ये १२० वर्षे वास्तव्य करून सन १५१८ मध्ये सतलोकास गेले. पूर्णब्रह्म कबीर परमेश्वर ('कर्विदेव') सतलोका (ऋतधाम) तून पुन्हा सन १७२७ मध्ये सशरीर येऊन साहेब गरीबजासजींच्या जीवात्म्यास सत्यलोकी घेऊन गेले होते. आदरणीय गरीबदास साहेबजींना मृत जाणून क्रियाकर्म करण्यासाठी चितेवर ठेवले होते. त्याचवेळी त्यांचा जीवात्मा कबीर साहेबजींनी परत त्यांच्या शरीरामध्ये आणला होता. त्यानंतर आदरणीय गरीबदासजींही परमपुज्य कर्विदेव (कबीर परमेश्वर)यांची महिमा जनसमुदायास ऐकवू लागले. जो कोणी दु:खी प्राणी गरीबदासर्जीकडून उपदेश प्राप्त करेल, तोच सुखी होईल. गरीबदासजींची वाढती महिमा तथा तत्वज्ञानासमोर अन्य गुरुंचे (आचार्यांचे) अधुरे (अपुर्ण) ज्ञान उघडे पडायचे. त्यामुळे आसपासच्या सर्व अधुऱ्या ज्ञानयुक्त गुरु (आचार्यजन) त्यांच्याशी अत्याधिक ईर्ष्या करू लागले. आसपासचे मुख्य-मुख्य चौधरींना त्यांच्याविषयी उलटे, अयोग्य सांगुन उलटपट्टी पढवली होती. त्यामूळे आसपासच्या गावातील सामान्य व्यक्ती ही प्रभू कबीर साहेबांच्या प्रिय बालक आदरणीय गरीबदासजींशी घृणा करू लागले.

दिल्लीच्या 'वाजीदपूर' गावामध्ये त्यांचा एक शिष्य होता. त्याच्याशीही पूर्ण गाव ईर्ष्या करायचे. त्याच्या प्रार्थनेवर गरीबदास साहेबजी काही दिवस वाजीदपूरामध्ये थांबले. त्याचवेळ टोळ किड्यांच्या दलाने आसपासच्या क्षेत्रामधील बाजरीच्या पिकास नष्ट केले. परंतु गरीबदासजींच्या सेवकाच्या पीकास कोणतीच हानी झाली नाही. सर्व ग्रामवासी गरीबदासजींच्या महिमेने अत्यंत प्रभावित झाले. तथा गरीबजींकडून त्यांचे ज्ञान स्वीकार करून आपले आत्मकल्याण करवून घेतले.

गरीबजींच्या आदेशाने त्यांच्या भक्ताने त्या बाजरीच्या धान्यास पूर्ण गावामध्ये वाटून टाकले तसेच गरीबदासजींच्या वारंवार मनाई करुनही काही बाजरीचे धान्य बैलगाडीमध्ये ठेवले आणि म्हटले की, ''प्रत्येक पोर्णिमेस आपण भंडारा (महाप्रसाद) करतात काही प्रमाणात दान आपल्या दासाकडूनही होऊन जाईल''. भक्ताची श्रद्धा पाहून गरीबदासजींनी स्वीकृती प्रदान केली. (आदरणीय गरीबदासजींची चार पुत्रे व दोन कन्या असा परिवार होता व अंदाजे '१३०० एकर' जमिनीचे ते स्वामी/मालक होते.) त्याच बैलगाडीमध्ये

बसून आपजी गाव छुडानीस जाण्यास निघाले. रस्त्यामध्ये काणौंदा गावास पोहोचताच. स्वार्थी गुरुंनी (आचार्यांनी) संत गरीबदासजींना घेरले आणि सर्व बाजरीचे धान्य लुटले. आणि त्याच गावच्या चौधरी छाजूराम छिक्कारा यांना सूचना केली की, हिंदू धर्माचा द्रोही पकडलेला आहे. चौधरी छाजूरामजींच्या आदेशाने गरीबदासजींना चौपाटी मध्ये (वेशीमध्ये) बांधले गेले. चौधरी छाजूरामर्जीना सरकारातर्फे काही शासकीय न्यायीक अधिकार प्राप्त झालेले होते. सहा महिन्याची शिक्षा, पाचशे रुपये दंड तथा महादोषीस कोठडी मध्ये बंद करणे, इत्यादी अधिकार सम्मिलीत होते.

त्या धर्म अज्ञानी गुरु आचार्याद्वारे पूर्वीच चौधरी छाजूराम छिक्कारजीना विपरीत ज्ञान रिजवल्यामुळे त्यांनी त्या परम आदरणीय गरीबदासजी महाराजांना तुरुंगामध्ये (काठमध्ये) बंद केले. ('काठमध्ये बंद करणे' ही एक प्रकारची कठीण कारागाराची शिक्षा होती, की ज्यात दोन्ही पायांच्या गुडघ्यांच्या वर दोन काष्ठ (वृक्षाच्या लाकडाचे ओंडके) /मोठी दांडके बांधून दोन्ही हातांस मागे बांधले जात असे.) बैलगाडी चालक रिक्त गाडी घेऊन गाव 'वाजीदपूर' पोहचला. जे गाव 'कौणांदा' पासून अंदाजे १० कि.मी. दूरीवर आहे. सर्व सूचना प्राप्त होताच वाजीदपूर गावातील काही मुख्य व्यक्ति तात्काळ 'कौणांदा' गावी पोहोचले. अन् चौधरी छाजूरामजींशी त्यांनी प्रार्थना केली तथा समझवण्याचा फार प्रयत्न केला की, ''हे सामान्य व्यक्ती नसून हे परम शक्तीसंपन्न आहे. आपण क्षमायाचना करा'' चौधरी छाजूरामजी अत्यंत पवित्र आत्मा तसेच अत्यंत दयाळू व नम्र हृदयाचे व्यक्ती होते. परंतु त्या स्वार्थी व प्रभुताच्या उपाशी गुरुंनी (आचार्यांनी) त्या पूण्यात्म्याशी छाजूराम छिक्काराजीस असत्य कथा ऐकवून प्रभुंच्या प्रिय बालक आदरणीय गरीबदासजींच्या प्रति अत्याधिक प्रमाणात घृणा निर्माण करून ठेवली होती. ज्या कारणाने चौधरी छाजूरामजीनी विनाकारण, न जाणता शिक्षा प्रारंभ केली होती. वाजीदपूरच्या भक्तांची प्रार्थना मान्य करून आदरणीय गरीबदासजी महाराजांना त्याने मुक्त केले. आदरणीय गरीबदास साहेबर्जीनी काहीच म्हटले नाही व आपल्या गावी छुडानीस आले.

काही दिवसानंतर चौधरी छाजूरामजी प्रात: काळी प्रात:विधी (शौच) स्वच्छतेसाठी 'जोहड' (तलावा)वर गले. तेव्हा त्यांचे दोन्ही हात दोन घोडेस्वारांनी तोडून टाकले. त्याचवेळी त्यांच्यासमक्ष ते घोडेस्वार अदृश्य झाले. ह्या दृश्यास तलावावर उपस्थित काही व्यक्तींनीही पाहिले. फार उपचार केले तरीही वेदना व रक्तस्राव बंद झाला नाही. ते फार दिवसापर्यंत वाईट प्रकारे वेदनेने तडफडून ओरडत राहिले. नंतर एका व्यक्तीने सांगितले, ''तुम्ही आदरणीय गरीबदासजींच्या जवळ जाऊन क्षमा-याचना करा, ते दयाळू आहेत''. परिवारजनांनी त्या चौधरीस घोड्यावर बसवून छुडानी गावी आणले. श्री छाजुरामजी जाताच आदरणीय गरीबदासजींच्या चरणावर पडले अन् क्षमा याचना केली. संत गरीबदासजींनी



आशीर्वाद दिला. तथा नाम उपदेश दिला तथा आजीवन भक्ति करण्यास सांगितले. चौधरी छाजुरामजींनी म्हटले, ''दाता, मला आपल्याविषयी अत्याधिक भ्रमित करून ठेवले होते. मला माहित नव्हते कि आपण पूर्ण परमात्मा आहात''. आदरणीय गरीबदासजींनी म्हटले 'मी पूर्ण परमात्मा कबीर साहेब (कविर्देव) कोष्टी (विणकरांचा)चा पाठविलेला दास आहे. त्यांच्याच शक्तीने आपण ठीक झालात मी आपणास कोणता शाप दिलेला नव्हता. आपल्या कर्माचे फळ आपणाप प्राप्त झाले आहे. जर येथे आले नसता तर आपल्या परिवारावर आणखी सुद्धा पापाचा प्रभाव होता. आता तो प्रभाव राहणार नाही. कारण आपण उपदेश प्राप्त केलेला आहे. चौधरी छाजुरामजींनी आपल्या सर्व परिवारास उपदेश प्राप्त करवला. आजसुद्धा त्या पुण्यात्म्या छाजूरामर्जीचे वंशज आदरणीय गरीबदासजींची परम्परागत पूजा करत आहेत. अंदाजे शेकडो परिवार आहेत त्यांना 'छाजूवाडा' म्हटले जाते.

**कारण की:-** **तुमने उस दरगाह का महल ना देख्या। धर्मराय के तिल-२ का लेख॥**
**राम कहै मेरे साध को, दु:ख ना दीजो कोए।**
**साध दुखाय मैं दु:खी, मेरा आपा भी दु:खी होय॥**
**हिरण्यकश्यप उदर (पेट) विदारिया, मैं ही मार्या कंश।**
**जो मेरे साधु को सतावै, वाका खो-दूं वंश॥**
**साध सतावन कोटि पाप है, अनगिन हत्या अपराधं।**
**दुर्वासा की कल्प काल से, प्रलय हो गए यादव ॥**

उपरोक्त वाणीमध्ये सद्गुरु गरीबदासजी साहेब प्रमाण देत आहेत की, 'परमेश्वर म्हणतात की, 'माझ्या संतास दु:खी करू नकोस. जो माझ्या संतास दु:खी करतो समझा मला दु:खी करत आहे. जेव्हा माझ्या भक्त प्रल्हादास दु:खी केले तेव्हा मी हिरण्यकश्यपाचे उदर (पोट) फाडले आणि मीच कंसास मारले. जो माझ्या साधुस दु:खी करेल, मी त्याचा वंश नष्ट करेन. म्हणूनच संतास त्रास दिल्यास करोडो पाप लागतात. जसे काय अनगिनत (अनंत) हत्या केल्या आहेत. हे अज्ञानी लोक परमात्म्याच्या संविधानास परिचीत नाहीत. त्यामुळेच भयंकर चूक करत आहेत. अन् नंतर दंडाचे भागीदार बनतात. साधुस त्रास दिल्याने निम्न दंड मिळतो.

जर एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याचा मृत्यू करतो, तर त्याचा दंड त्याची पुढील जन्मी हत्या झाल्याने पूर्ण होतो. परंतु संतास त्रास देण्याचा अत्यंत विशाल दंड आहे जो अनंत जन्मांतही पूर्ण होत नाही. सद्गुरु आपल्या वाणीमध्ये म्हणतात की :-

**अर्धमुखी गर्भवास में हरदम बारम्बार, जूनी भूत पिशाच की, जब लग सृष्टि संहार ॥**

अशी चूक करणाऱ्यास परमेश्वर वारंवार मातेच्या गर्भामध्ये प्रस्थापित करुन वारंवार मृत्यूस प्राप्त होतो आणि जोपर्यंत सृष्टि प्रलय होत नाही तोपर्यंत भूत-पिशाच्च योनींमध्ये व

मातेच्या गर्भामध्ये ठेवले जाते जे की अत्यंत दु:खदायक ठरते आणि तोपर्यंत क्षमा मिळत नाही. जोपर्यंत तो संत माफ करत नाही.

एकदा दुर्वासा ऋषींनी अभिमानवश होऊन अम्ब्रीष ऋषींना मारण्यासाठक्ष आपल्या शक्तीने एक सुदर्शन चक्र सोडले. सुदर्शन चक्र अम्ब्रीष ऋषींच्या चरणास स्पर्श करून परत दुर्वासाऋषींस मारण्यासाठी त्यांच्या दिशेने येऊ लागले. दुर्वासा ऋषींना वाटले की; आपण फार मोठी चूक केलेली आहे. परंतु अधिक वेळ नसल्याचे पाहून दुर्वासा ऋषीं सुदर्शन चक्राच्या पुढे पुढे धावू लागले. पळता पळता श्री ब्रह्माजींच्या जवळ गेले आणि म्हटले की, ''भगवान, कृपया, आपण मला ह्या सुदर्शन चक्रापासून वाचवा.'' यावर ब्रह्माजी म्हणाले की, ''ऋषीजी, ही माझ्या क्षमतेची गोष्ट नाही.'' आपल्यावरील आलेले संकट टाळून ते म्हणाले, ''आपण भगवान शंकराजवळ जावे. तेच आपणांस वाचवू शकतील.'' हे ऐकताच दुर्वासा ऋषि भगवान शंकराजवळ गेले. अन् म्हटले की, ''हे भगवान, कृपा करून आपण मला ह्या सुदर्शन चक्रांपासून वाचवा.'' यावर भगवान शिवनेही ब्रह्माजी समान टाळत म्हटले कि, ''आपण श्री विष्णू भगवानजींकडे जावे. तेच आपणास वाचवू शकतील.'' हे ऐकून लगेच भगवान विष्णूच्या जवळ जाऊन दुर्वासा ऋषींनी म्हटले, ''भगवान, आपणच मला ह्या सुदर्शन चक्रापासून वाचवू शकतात. अन्यथा हे मला छाटून मृत्यूस प्राप्त करील.'' ह्यावर भगवान विष्णूजी म्हटले की, ''हे ऋषीजी, हे सुदर्शन चक्र आपणांस का मारू इच्छिते?'' यावर दुर्वासा ऋषींनी सर्व कथा सांगितली. तेव्हा विष्णूजी म्हटले की, ''हे दुर्वासा ऋषी, जर आपण त्याच अम्ब्रीष ऋषि चे चरण पकडून माफी मागाल तर हे सुदर्शन चक्र आपला जीव घेण्याचे त्यागेल. अन्यथा आपणांस मीच काय, कोणीही देव वाचवू शकत नाही. याचा दुसरा कोणताच विकल्प नाही. मारणारा का नाही करणार असे?'' तेव्हा दुर्वासा ऋषींनी पुन्हा मागे जावून अम्ब्रीष ऋषींचे चरण पकडून रडू लागले व त्यांनी ह्रदयापून माफी मागितली. तेव्हा अंबरीष ऋषींनी ते सुदर्शन चक्र आपल्या हाती पकडून दुर्वासा ऋषीस दिले. अन् म्हटले कि, ''संतांच्या/ऋषिंच्या सोबत गैरवर्तन कधीही करु नये. अन्यथा त्याचा परीणाम अत्यंत वाईट होतो.''

''श्रीकृष्ण गुरु कसनी हुई और बचेगा कौन''

जेव्हा श्री कृष्णजींचे गुरु श्री दुर्वासा ऋषीसारख्यांची अशी वाईट स्थिती होते तर सामान्य मनुष्य कसा वाचू शकतो?





# ८. सत्यभक्तीच्या भ्रमीतांना मार्ग विषय

**''भक्तसमाज प्रभूंच्या वास्तविक भक्तीपासून अति (अनंत कोस) दूर''**

सतलोक आश्रम करौंथा, जिल्हा-रोहतक, हरियाणा मध्ये कविर्देवाच्या (कबीर परमेश्वर) च्या प्रकट दिवसाच्या निमित्ताने चाललेल्या पाच दिवसीय (१८ ते २२ जून २००५) पर्यंत सत्संग समारोहामध्ये भक्त वसंतसिंह सैनीने आपली कथा सांगितली. कृपया खालीलप्रमाणे सांगितलेली कथा आहे, ती वाचावी.

## ''प्रभू प्राप्तीसाठी तहानलेल्या भक्त वसंतसिंह सैनीस मार्ग मिळाला.''

मी वसंतसिंह सैनी गाव- गांधरा, जिल्हा-रोहतक, हरियाणा येथील रहिवाशी आहे. तसेच जुना पत्ता- म.नं.एस.१६१, पांडवनगर, मदर डेअरीजवळ, यमुनापार, दिल्ली-९२. येथे वास्तव्य करत होतो. आमच्या परिवारावर दु:खाचा पर्वतच तुटून पडला होता. तरीही परमात्म्यास प्राप्त करुन घेण्याची इच्छा व दु:खाची निवर्तिसाठी संत व महंताच्याजवळ येणे जाणे चालू होते. परंतू कोठेही आमच्या दु:खाचे निवारण झाले नाही. शेवटी एक प्रसिद्ध संत श्री आसाराम बापूजींशी भेटलो. त्यावेळी आसाराम बापूजींची शिष्यसंख्या दिल्लीमध्ये अंदाजे एक हजार होती. ज्या कारणाने अत्यंत जवळून भेटण्याची संधी प्राप्त झाली. आम्ही आपले दु:ख व परमात्मा प्राप्तीची जिज्ञासा त्यांच्यासमोर प्रकट केली. त्यांनी आम्हांस ७ मंत्र (ॐ गुरु, हरिॐ, ॐ ऐं नम:, ॐनम: शिवाय, ॐ नमो भगवते वासुदेवाय, ऱ्हीं रामाय नम: व गायत्री मंत्र इत्यादी) सांगितले. यामधील एक निवडण्यास सांगितले तसेच एक 'सोहं' मंत्र जो श्वासाद्वारे 'सो' आत व 'हं' बाहेर सोडतात. असा जप करण्यास सांगितले. एकादशी व पौर्णिमा यांचे व्रत, सोमवारचे व्रत व अष्टमी चे व्रत करण्यास सांगितले. जास्त करून त्रिबंध प्राणायाम व सिद्धासनामध्ये बसून ध्यान लावणे व अनुष्ठान करण्यास सांगितले. आम्ही मंत्र घेतला तथा आपले दु:ख त्यांच्यासमोर रडून सांगितले कि, आमचे काका (चुलते) जे चाळीस वर्षापूर्वी मयत (मेले) झालेले होते ते अत्यंत भयंकर पिशाच्च झालेले आहेत. त्यांनी आमच्या दोन्ही बंधूंचा मृत्यू केला. आठ-दहा म्हशींनाही मारुन टाकले. पाच-सहा गायींस मारुन टाकले. पशुची कोणतीही संतान जिवंत राहत नाहीत. घरातील सर्व व्यक्ती व्याधीग्रस्त राहतात. आम्ही दु:खाने बेहाल झालेलो आहोत. कोणताच व्यवसाय चालू देत नाही. आता

ते पिशाच्च म्हणत आहे की, ''आपल्या पिताजींसही घेऊन जाणार.'' आम्ही बापूजींची प्रार्थना केली की, ''आम्हास वाचवा.'' परंतु सहा महिन्यानंतर ते पिशाच्च आमच्या पिताजींनाही घेवून (मृत्यू) गेले. बापूजींनी म्हटले कि, ''जे झाले ते होणारच होते. पशु इत्यादी व धनाची हानी तथा शारीरीक व्याधी हे पापांचे भोग आहेत. जे जीवाच्या प्रारब्धामध्ये लिहिलेले असते, ते तर भोगायलाच लागते. आपण भक्ति करा.'' त्यानंतर आम्ही परमात्मा प्राप्तीसाठी प्रयत्न (भक्ती) करू लागलो बापूजींच्या समजावल्या नंतर आम्ही परमात्मा प्राप्तीसाठी पूर्ण श्रद्धेने भक्ती करू लागलो. तसेच मी (बसंत दास) सर्व प्रथम 'श्री आसाराम बापू आश्रम, दिल्ली' मध्ये चाळीस दिवसांचे अनुष्ठान महन्त 'नरेंद्र ब्रम्हचारी' यांच्या सल्ल्याने त्यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण केले. त्यानंतर ४० दिवसांचे ६ अनुष्ठान 'आसाराम बापू आश्रम, पंचेड रतलाम्, मध्यप्रदेश.' मध्ये महन्त काकाजींच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण केले. त्यानंतर दोन अनुष्ठान आसाराम आश्रम, साबरमती, अहमदाबाद गुजरात. येथील ''मौन मंदीर'' मध्ये पूर्ण केलेत. जेथे श्री आसाराम बापूजींशी योग्य प्रकारे संवाद करण्याची संधी प्राप्त झाली. तेव्हा श्री बापूर्जींना मी विचारले कि,''बापूजी, ज्या परमात्म्यास प्राप्त करण्यासाठी मी तथा सर्व भक्त समाज प्रयत्न करीत आहे. तो परमात्मा कोण आहे? कसा आहे? तसेच तो कोठे वास्तव्य करतो? हे सांगण्याची कृपा करावी.''

हे ऐकून बापूजी म्हटले कि, ''आपण प्रयत्न करत रहा. सर्व गोष्टी समजतील.'' पुढे त्यांनी सांगितले कि, ''गीताजीच्या एका अध्यात्म्याचा पाठ (वाचन) प्रतिदिन करणे आवश्यक आहे आणि कधी माझ्या दर्शनाची इच्छा असेल तर एक क्रिया सांगतो की, 'तीन दिवसापर्यंत एका खोलीमध्ये बंद व्हा. खोलीमध्ये बंद झाल्यानंतर पहिल्या दिवशी भोजन/जल यांचा त्याग करा. कारण की, संध्याकाळ पर्यंत शौच (लॅटरीग व बाथरुम) यापासून निवृत्ती प्राप्त होईल. त्याच्या तीन दिवसापर्यंत काहीही आहार पाणी घ्यायचा नाही न बाहेर जायचे. खोलीमध्ये राहून त्राटक करा.'' घरी जाऊन मी हे तीन वेळा केले. परंतु बापूजींचे दर्शन झाले नाही. अनुष्ठानाच्या वेळी जीवन मृत्यूशी झुंजून व्याधींचा (आजारांचा) सामना करावा लागला. परंतु त्यानंतरही परमात्मा प्राप्तीसाठी प्रयत्न करीत राहिलो.

'सप्टेंबर २०००' मध्ये संत रामपालजी महाराज यांचा सत्संग 'काठमंडी, रोहतक' मध्ये ऐकला, त्यांनी तत्वज्ञानाच्या आधारे गीताजीचे ज्ञान समजावले. त्यानंतर गीताजीचा पाठ (वाचन) केल्याने मनामध्ये प्रश्न येऊ लागले कि, ''गीताजी मध्ये भगवान काय म्हणत आहेत आणि बापूजी काय सांगत आहेत. काय खरंच आपण भगवानाविरुद्ध साधना तर करत नाही ना? संत रामपालजी महाराजांद्वारे सांगितलेल्या गीताजीच्या अनुवादास समझावून घेतले तर अंतरात्मा रडू लागली. तथा बापूर्जींशी भेटून ह्या सर्व शंका विचारण्याचे इच्छिले. मी बापूर्जींच्या जवळ गीता घेऊन गेलो तथा गीताजीस दाखवून सर्व शंका विचारल्या. परंतु



बापूर्जींनी कोणत्याच शंकेचे समाधान केले नाही. मी बापूर्जींस म्हटले, ''बापूजी, आपणांस परमात्म्याविषयी काहीच माहित नाही तर आपण भक्त समाजास आपल्या मध्ये अडकवून का ठेवत आहात? यावर बापूजी माझ्याकडे रागाने पाहून म्हणाले की, ''तु भक्तीच्या विषयामध्ये काय जाणतोस?'' यावर मी रडत रडत आपल्या घरी आलो.

परमात्म्याची प्राप्ती न झाल्याने तसेच श्रमीष्ट जीवनास पाहून तसेच हठरुपी अनुष्ठान व व्रत केल्याने देह अतिशय अशक्त बनले. तोच मृत्यूसमीप दृष्टीमय झाला. नंतर अन्य संत (राधास्वामी पंथ, धन-धन सतगुरु, श्री सतपालजी महाराज , श्री बालयोगेश्वरजी महाराज, दिव्य ज्योती, ब्रह्मकुमारी, निरंकारी मिशन, जय गुरुदेव मथुरावाले इत्यादी) यांच्याजवळ भटकत गेलो. परंतु जे निर्णायक ज्ञान संत रामपालजी महाराजांनी सांगितले, ते उपरोक्त कोणाही संताजवळ किंवा पंथाजवळ नाही. मला पश्चाताप झाला की, ''यावेळी खरंच पृथ्वीवर कोणी संत असा नाही की ज्यास, परमात्मा प्राप्ती झालेली आहे. अन् जो सांगू शकेल की, परमात्मा कोण आहे? कसा आहे? अन् कोठे वास्तव्य करतो? या विचाराने ढसा ढसा रडत राहिलो. आणि माझा संतावरचा विश्वास उडाला. मनामध्ये विचार आला कि, ''जर श्री आसारामजीसारखे सुप्रसिद्ध संतच शास्त्रविधी त्यागून मनमानी (मनमुखी) आचरण करतात अन् करवतात तर कोणत्या संतावर आपण विश्वास ठेवावा? संत रामपालजी महाराज ज्ञान तर श्रेष्ठ सांगत आहेत परंतु त्यांच्याजवळ जनसमुदाय अत्यंत कमी आहे, तर ते पूर्णसंत कसे काय होऊ शकतील?'' ही शंका मनामध्यें आली. काही दिवसानंतर संत रामपालजी महाराजांचा एक शिष्य आमच्या गावामध्ये भेटला. अन् त्याने माझी सर्व हकीकत ऐकून मला पुन्हा परमात्मा स्वरुप 'पूर्ण संत रामपालजी महाराज' यांच्या सत्संगामध्ये परत आणून बसविले. मी एका तासाचा सत्संग ऐकला. अन् सत्संगानंतर रडत रडत महाराजांना भेटलो. महाराजर्जींनी मला हृदयाशी लावून म्हटले, ''ज्या संतांकडे आपण जात होता, ते शास्त्रविधी त्यागून मनमुखी आचरण करत आहेत तसेच करवत आहेत.'' जसे ते पूर्वीच जाणत होते की, मला काय पाहिजे आणि माझ्या सर्व शंकांचे समाधान संत रामपालजी महाराजांनी आपल्या चरणांमध्ये बसवून केले.

तत्वदर्शी संत रामपालजी महाराजांनी सांगितले की, ''पवित्र गीताजी अध्याय ९ मंत्र २५ मध्ये 'पित्र पुजन' अर्थात श्राद्ध करणे अमान्य केले आहे. देवी-देवतांची पूजा करणारे मंदबुद्धी असल्याचे लिहिलेले आहे. (गीता अध्याय ७ मंत्र १२ ते १५ तथा २० ते २३ पर्यंत) परंतु श्री आसारामजी ''श्राद्ध महिमा'' नावाच्या पुस्तकामध्ये श्राद्ध करणे ही श्रेष्ठ विधी सांगतात. संतश्री आसारामर्जींच्या 'साबरमती अहमदाबाद आश्रम' पासून प्रकाशित पत्रिका ऋषिप्रसाद अंक -१३५ मार्च २००४ मध्ये लिहिलेले आहे कि भूत (पिशाच्च) पूजणारे तथा पित्र पूजणारे तथा अन्य देवी-देवातांचे पूजन करणारे काय बनतील, वाचा पुढील

अंकामध्ये.

पुढील अंकाची पत्रिका ऋषिप्रसाद अंक १३६ एप्रिल २००४ पृष्ठ १९ वर लिहिलेले आहे की, ''भूत (पिशाच्च) पूजणारे भूत लोकास (धामांस) प्राप्त होतील. तथा 'पित्र' पुजणारे पित्र लोकांस प्राप्त होतील. तथा श्री कृष्णास पुजणारे भगवान श्री कृष्णजींच्या वैकूंठ लोकास प्राप्त होतील. श्री आसारामजींद्वारे प्रकाशित 'श्राद्ध महिमा' नावाच्या पुस्तकामध्ये पित्र पुजनाची सुरेख विधी लिहिलेली आहे. यावर विचार करा.

**कृपया विचार करा :**

कोणी व्यक्ती असे ही सांगत असेल की, विहिरीमध्ये पडणारे मृत्यूस प्राप्त होतात. तरीही स्वयंम विहीरीमध्ये पडण्याचा परामर्श करत असेल आणि म्हणत आहे की, ''विहीरीमध्ये पडण्याची सुरेख विधी सांगतो कि, 'दोन्ही पाय उचला अन् एकदम जोरात उडी मारा' ही विहीरीमध्ये पडून मरण्याची श्रेष्ठ विधी आहे. जो असे नाही करणार तर तो दोषी आहे''.

काय ती व्यक्ती सभ्य (पवित्र) आहे? ही भूमीका श्री आसारामजी संत करत आहेत की, एकीकडे ते असे म्हणत आहेत की, पित्र व भुत पुजणारे भुत (पिशाच्च)व पित्र बनून भूतलोक व पित्रलोक यामध्ये जातील. तेथे ते उपाशी (भुके), तहानलेले राहतील. नंतर त्यांना श्राद्धांद्वारे तृप्त केले जाते. एक आणि एकीकडे विचारणीय विषय आहे, कि जेव्हा आपले माता पिता जीवीत होते तेव्हा ते प्रतिदिन कमीत कमी दोन वेळा भोजन करायचे. आता मृत्यू नंतर ते श्री गीताजी विरुद्ध साधना करून दु:खदाई भूत (पिशाच्च) व पित्र योनीना प्राप्त झालेले आहेत. आता एक दिवसाच्या श्राद्धाने ते कसे काय तृप्त होऊ शकतील? ३६४ दिवस काय भोजन करतील? त्यासाठी संत व गुरुजन दोषी आहेत, जे भोळ्या भाबड्या आत्म्यांना, जनतेला फसवून सत्यमार्गापासून विचलीत करून भ्रमीत करत आहेत. शास्त्रज्ञानापासून व सतभक्तीपासून अपरिचित संतच ह्या जीवांस शास्त्रविधीरहित साधना करवून दु:खदाई योनीमध्ये ढकलत आहेत.

श्री आसारामबापूजी श्री शिवजीची उपासनेचा मंत्र ('ॐ नमो शिवाय') व श्री विष्णुजीचा मंत्र ('ॐ नमो भगवते वासुदेवाय') सांगतात याच्या व्यतिरिक्त 'हरि ॐ, ॐ गुरु' आदी नामांमधील कोणताही एक मंत्र आपल्या इच्छेनुसार निवडून घेण्यास सांगतात. तसेच 'सोहं' याचे दोन भाग करुन श्वासाद्वारे स्मरण करणे इत्यादी मंत्र प्रदान करतात. कोणत्याही शास्त्रामध्ये प्रमाण नाही.

**जरा विचार करा :** कोणी रोगी ज्याच्या पोटात दुखत असेल तेव्हा वैद्याजवळ उपचारासाठी प्रार्थना करतो. तेव्हा वैद्य (डॉक्टर) त्याच्या समोर सहा प्रकारच्या गोळ्या ठेवून म्हणतो की,''तुझ्या इच्छेने यातील एक गोळी उचल अन् सेवन कर'' काय तो वैद्य (डॉक्टर) असू शकतो? पवित्र गीताजी अध्याय ८ मंत्र १३ मध्ये म्हटले आहे कि:



**ओम् इति एकाक्षरम ब्रह्म, व्यहरन् माम् अनुस्मरन्, य: प्रयाति त्यजन् दैहम् स: याति परमाम् गतिम् ॥१३॥**

याचा शब्दार्थ असा आहे की, ''गीता सांगणारा ब्रह्म अर्थात काळ म्हणत आहे की, (माम ब्रह्म) माझे, ब्रह्मचे तर (इति) हे एक (ओम एकाक्षरम्) 'ओम' एक अक्षर आहे. (व्याहरन्) उच्चारण करून (अनुस्मरण) स्मरण करायचे आहे (च) जो साधक (त्यजन् देहम्) शरीर त्यागन्यापर्यंत अर्थात अंतीम श्वासापर्यंत (प्रयाति) याची स्मरण साधना करतो (स:) तो साधकच माझ्या (परमाम गतिम्) परमगतीस (याति) प्राप्त होतो.''

**भावार्थ :** आहे कि, श्री कृष्णजींच्या शरीरामध्ये प्रेतवश करून ब्रह्म अर्थात हजार भुजा असलेला ज्योतिनिरंजन काळ म्हणत आहे की, ''माझी ब्रह्मची साधना केवळ 'ओम्' (ॐ) नावाने मृत्यूपर्यंत करणारा साधकालाच माझ्यापासून मिळणारा लाभ प्राप्त होतो. अन्य कोणताही मंत्र माझ्या भक्तीचा नाही तथा आपल्या गतीसही गीता अध्याय ७ मंत्र १८ मध्ये 'अनुत्तमाम' अर्थात अति निच (कनिष्ठ) सागितलेले आहे. याचेच प्रमाण गीता अध्याय ९ मंत्र २० ते २५ मध्ये म्हटलेले आहे की ''जे तीन्ही वेदामधील (ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद) वर्णित विधीद्वारे माझी साधना करतात तथा अन्य देवतांची पूजा करतात त्यांचा जन्म मृत्यू तसेच स्वर्ग-नर्क बनून राहतो तसेच पित्र पुजणारे (श्राद्ध करणारे) पित्र बनून पित्रांस प्राप्त होतात. भूत (पिशाच्च) पुजणारे (तेरावा, दहावा, सतरावा, वर्षश्राद्ध अस्थी गंगा इत्यादीमध्ये विशेष क्रिया करून विसर्जीत करणे. पिंड भरवणे इत्यादी भूतपूजा, पिशाच्च पूजा आहेत.) भूत (पिशाच्च) बनून ते भूतलोकामध्ये जातील, नंतर पृथ्वीवर भटकत राहतील. ही पूजा अविधीपूर्वक अज्ञानपूर्वक मनमुखी आचरण असल्याने व्यर्थ आहे. याचे प्रमाण गीता अध्याय १६ मंत्र २३-२४.

**विशेष** : येथे चौथ्या अथर्ववेदाचे विवरण यासाठी नाही. कारण त्यामध्ये पुजा विधी अल्प प्रमाणात असून सृष्टी रचना अधिक आहे. यामुळे गीता अध्याय १८ चा मंत्र ६२ मध्ये म्हटलेले आहे कि, ''त्या परमात्म्याच्या शरणामध्ये जा. ज्यापासून तुझी पूर्ण मुक्ती होईल, परमशान्ति आणि शाश्वत स्थान अर्थात सत्यलोकास प्राप्त होईल''. तसेच गीता अध्याय १५ मंत्र ४ मध्ये म्हटलेले आहे की, ''तत्वदर्शी संत प्राप्त झाल्यानंतर त्याच्या सांगण्यानुसार शास्त्र विधीनुसारच भक्ती करणे अत्यावश्यक आहे. नंतर या परमपद परमेश्वराचा शोध घेतला पाहिजे. जेथे गेल्यानंतर साधकाचा कधीही पुन्हा जन्म-मृत्यू होत नाही. अर्थात 'अनादि मोक्ष' प्राप्त होतो. (गीता वक्तव्य करणारा काळ अर्थात क्षरपुरुष ब्रह्म म्हणत आहे की,) मी सुद्धा त्याच आदिपुरुष परमेश्वराच्या शरणामध्ये आहे.

संत रामपाल महाराजांनी सांगितले कि, ''अन्य सर्व संत सांगतात की, पापाचा भोग तर प्रारब्धामध्ये लिखित असल्याने जीवास भोगावाच लागतो भक्ति करत राहणे आवश्यक आहे, येणारे दुसरे जीवन (जन्म) सुखमय होऊन जाईल'.

**कृपया विचार करा :** कोणाच्या पायामध्ये काटा घुसल्याने अत्यंत वेदना होत असेल. त्या काट्याच्या वेदना निवारणासाठी कोणांस विचारले असता उत्तर मिळाले की, ''काटा पायात घुसलेला राहू दे, तू फक्त पादत्राणे परिधान कर त्यामुळे भविष्यात काटा लागणार नाही.'' काय ती व्यक्ती योग्य सल्ला (मार्गदर्शन) देत आहे? कारण काटा लागल्यावर पायात पादत्राणे घालणेच अशक्य आहे. प्रथम काटा तो काढेल आणि नंतरच भविष्यात पुन्हा काटा लागू नये या भितीने पायात पादत्राणे परिधान करेल. हाच योग्य सल्ला आहे नां? ठीक याचप्रकारे पूर्णपरमात्म्यांच्या पूर्ण संतांच्या शरणामध्ये आल्यानंतर पापरुपी काट्यांचे कष्ट समाप्त होते. नंतर साधक पूर्ण प्रभूंची शास्त्रविधीनुसार साधनारुपी पादत्राणे ह्या भीतीने परिधान करेल की, कोठे पुन्हा कोणताही पापरुपी काटा कष्टदायक होऊ नये.

सर्व संतांनी पवित्र गीताजीच्या अनुवादामध्ये अर्थाचा अनर्थ केलेला आहे. गीता अध्याय ७ मंत्र १८ व २४ मध्ये अनुत्तमाम याचा अर्थ ''अति उत्तम'' असा केलेला आहे. तसेच 'व्रज' याचा अर्थ 'येणे' असा केलेला आहे. परंतु 'अनुत्तम' याचा अर्थ 'अति निच (कनिष्ठ)' असा होतो. 'वज्र' याचा अर्थ 'जाणे' असा होतो. तत्वज्ञानाच्या अभावाने तसेच ज्ञानहीन गुरुंच्या कारणाने सर्व भक्त समाज शास्त्रविधिरहित साधना करून मनुष्य जीवन व्यर्थ घालवत आहेत. (पवित्र गीता अध्याय १६ मंत्र २३-२४) सर्व पवित्र धर्माचे पवित्रात्मे तत्वज्ञानापासून अपरिचीत आहेत. त्यामुळे नकली (खोटे) गुरु संत, महंत, तसेच ऋषी यांचा जोर (दबाव) बनून राहिलेला आहे. ज्यावेळी पवित्र भक्तसमाज अध्यात्मिक तत्वज्ञानास परिचीत होतील त्या वेळी मात्र ह्या खोट्या सन्त गुरु व आचार्यांना लपून राहण्यासही स्थान मिळणार नाही.

उपरोक्त सत्यता नेत्रसमक्ष प्रत्यक्ष पाहून मी तथा अन्य परिवारातील व्यक्ती(सदस्य) संत रामपालजी महाराजजींच्या चरणांमध्ये लागले आहेत. स्वत:स अर्पण केलेले आहे. आता पूर्ण परीवारामध्ये कोणतीच व्याधी (आजारपण) राहिलेली नाही. आणि जे भूत कधीकाळी परिवाराच्या एक-एक सदस्यास मारत होते, पशुंस मारत होते, व्यवसाय-धंदा चालू देत नव्हते. ते घरातून नाही तर संपूर्ण गावातूनच पळून गेले तथा दुसऱ्या नातेवाईकांच्या (आप्तांच्या) घरी गेलेले आहेत. जे अजूनही श्री आसारामजीचे पुजारी आहेत तेथे जाऊन भुत म्हणत आहे की, 'तुमच्या बसंताच्या घरी आता परमात्माचा निवास झालेला आहे. त्यांना परमात्मास्वरुप पूर्ण संत प्राप्त झालेले आहेत. आता आम्ही त्या घरी जाऊ शकत नाहीत.'' संत रामपालजी महाराजांपासून उपदेश घेतल्यानंतर आम्ही पूर्णपणे स्वस्थ व सुखी जीवन जगत आहोत. आमचा परिवार व नातेवाईक मिळून अंदाजे दोनशे सदस्यांनी (व्यक्तींनी) संतरामपालजी महाराजांचा उपदेश प्राप्त केलेला आहे. जे पूर्वी श्री आसारामजी महाराजांचे शिष्य होते. संत रामपालजी महाराजांद्वारे सांगितलेल्या तत्वज्ञानास



समजावून घेऊन जवळजवळ दहा हजार श्री. आसारामजींचे शिष्य सुद्धा सतगुरु रामपालजी महाराजांच्या शरणामध्ये आलेले आहेत. ते सुद्धा माझ्या समान पश्चाताप करत आहेत. माझी भक्त समाजास प्रार्थना आहे कि, ''ज्यांनाही परमात्मा प्राप्तीची तळमळ (तीव्र इच्छा) शोध आहे. त्यांना प्रार्थना आहे की, परमात्मा स्वरुप पूर्ण संत रामपालजी महाराजांच्या चरणांशी येऊन आपल्या जीवनाचे कल्याण करून घ्या. तथा पूर्ण परमात्म्यास प्राप्त करुन घ्या''.

**- भक्त बसंत दास**

## ''अद्भूत करिश्मा''

पूजनीय गुरुदेवजी दंडवत प्रणाम, मी माझ्या परिवाराचा आनंद आदरपूर्वक सूचित करू इच्छितो की, 'जानेवारी २०००' च्या आरंभी आपला सत्संग (प्रवचन) 'ताजपूर' गाव, देहलीमध्ये श्री.मुरारी भक्ताच्या निवासस्थानी सुरु होता. तेव्हा एका अन्य भक्ताच्या पुत्रीने माझ्या पत्नीस श्रीमती विमलादेवीस (छावला) म्हटले की, ''चाचीजी, शेजारील गावामध्ये जो सत्संग सुरु आहे जर आपण त्या महाराजांकडून नाम उपदेश घ्याल तर आपला असाध्य रोग (गुडघ्याखालील रीढच्या अस्थीमधील एका इंचाचे अंतर) व्यवस्थीत (बरे) होऊ शकते. तेव्हा माझ्या पत्नीने त्या कन्येस विचारले की, ''ऑल इंडिया मेडीकल इन्स्टीट्यूट ऑफ रिसर्च सेंटर ऑफ सायन्स, दिल्लीमध्ये ज्याचे अडीच वर्षे उपचार चालूनही असफल झाले आहेत, तर त्या एक नाम अथवा शब्दामध्ये कोणती शक्ती आहे, की ज्याने माझा हा असाध्य रोग ठीक होईल?'' अधिक कालावधीपर्यंत दोघींचे तीव्र संभाषण चालू राहिले. शेवटी माघार घेऊन माझ्या पत्नीने त्या सत्संगामध्ये जाण्याचा निर्णय घेतला. परमपूज्य संत रामपालजी महाराजांचे प्रवचन /अमृतवाणी ऐकून अधुरी (अपुर्ण) सुटलेली भक्तीची तार पुन्हा बंदिछोडशी जोडली गेली. अन अडीच वर्षे उपचार करूनही फायदा न प्राप्त होता केवळ नामाच्या सुमरनाने पाच दिवसाच्या आतच असाध्य रोग ठीक (नष्ट) झाला. यापूर्वी डॉक्टरांनी तिला बसण्यास व उभे राहण्यास सक्त मनाई केलेली होती. जे आजही ट्रीटमेंट स्लीप वर लिहीलेले आहे. तसेच ते एक इंचाच्या अंतराचे (दूरीचे) एक्स-रे ही उपलब्ध आहेत. सर्वात अधिक समस्या माझ्या पत्नीस अशी होती की, 'तिला बसून स्वयपांक करता येत नव्हता. आणि हात धोवायच्या वेळी तर पंधरा मिनीटे ती रडायला लागायची. कारण जास्त वाळल्याने अधिकच वेदना होत होत्या. आता ती परमपूजनीय सद्गुरु रामपालजी महाराजांच्या आशिर्वादाने ५० किलोचे वजनही स्वत:च उचलू शकते आणि पूर्ण स्वस्थ आहे. माझी सर्व भक्तांना (वाचकांना) प्रार्थना आहे की, परमेश्वर तुल्य संतरामपालजी महाराज जे कविर्देव (कबिर परमेश्वर) जींचे पूर्णकृपापात्र आहेत, त्यांच्याकडून विनाविलंब मुफ्त नाम प्राप्त करून सपरिवार कल्याण करून घ्यावे व पूर्ण मोक्ष म्हणजेच सतलोक (शाश्वतम् स्थानम्) प्राप्त करावे.

आपला सेवक , **भक्त नथूराम,** गाव-छावला, दिल्ली. फोन-२०९१३९३६

## ''अशक्य ते शक्य केले, परमेश्वराने''

मी भक्त सुरेंद्रदास, गाव-गांधरा, तालुका- सांपला, जिल्हा-रोहतक, हरीयाणा. येथील रहिवासी आहे. माझे वय ३१ वर्षे आहे. तसेच लहानपणापासूनच परमेश्वर/परमात्म्याच्या शोधामध्ये मी व्यस्त होतो. तसेच मनमुखी पूजा (मंदिरामध्ये जाणे, व्रत इत्यादी करणे, श्राद्ध करणे इत्यादी) सुद्धा करत होतो. परंतु शारीरिक कष्ट व मानसिक अशांती नेहमीच बनून राहिलेली होती. तरीही परमात्म्याविषयीचा विश्वास व परमात्मा प्राप्तीची तळमळ, तीव्र इच्छा नेहमीच ज्वलंत होती. ही तळमळच मला सन १९९५ मध्ये संत आसाराम बापू यांच्याकडे घेऊन गेली. मी त्यांच्यापासून नामउपदेश घेतला व जसा भक्तिमार्ग बापूजींनी सांगितला, तशीच जिद्दीने मनापासून भक्तीसाधना केली. परंतु न शारीरीक कष्ट दूर झाले अन् न कोणती आध्यात्मिक उपलब्धी प्राप्त झाली. परंतु कष्ट मात्र वाढतच गेलेत. मी आसारामबापूंच्या सांगण्यानुसारच साधना करायचो. जसे की, २५० ग्रॅम दूध सकाळी पीत असे आणि २५० ग्रॅम दुध संध्याकाळी पीत होतो. माझ्या मंत्रामध्ये जेवढे अक्षर होते, तेवढे लक्ष (लाख) मंत्र जाप करणे आणि समाधी लावणे इत्यादी ४० दिवसांची क्रिया होती. जे कि हे एक अनुष्ठान होते. अशी मी १४ अनुष्ठाने केलीत.

एकदा मी बापूजींच्या सत्संगामध्ये ऐकले कि, सात दिवस विना आहाराचे मंत्र जाप करणे, समाधी लावणे. प्राणायाम करण्याने ईश्वर प्राप्ती होईल. नंतर मी ह्या वचनांस सत्य मानून असेच केले. परंतु परमात्मा प्राप्तिच्या ऐवजी निराहारीत (आहाराविना) राहिल्याने मृत्यूच्या जवळ येऊन पोहोचलो. तसेच प्राणायाम केल्याने मानसीक संतुलन बिघडून गेले आणि मी वेडसर होऊ लागलो.

त्याच दरम्यान माझ्यावर सद्गुरु पूर्व संत रामपालजी महाराजांची कृपा दृष्टि झाली. मला 'सप्टेंबर २०००' मध्ये 'पूज्य गुरुदेव संत रामपालजी महाराज' यांच्यापासून नामउपदेश प्राप्त झाला. उपदेश मिळताच असे वाटू लागले की, मी जसे काय कोणी माझ्यातील दिपकमध्ये (दिव्यामध्ये) घृत( तूप) घातले आहे आणि माझे जीवन शांत व्यवस्थित चालू लागले.

पूर्ण संत पाप कर्मांना नष्ट करू शकतात. याचे प्रमाण माझ्या जीवनामध्ये स्पष्ट रुपाने तेव्हा घडले की, जेव्हा मी 'मे २००४' मध्ये 'औरंगाबाद, महाराष्ट्र' मधील संतरामपालजी महाराज यांच्या संतसंगासाठी मंडप उभारण्याची सेवा करताना २५ फुट वरून खाली दगडी जमीनीवर पडलो. त्यावेळी काळास काही दुसरेच मंजूर होते. तथा माझ्या गुडघ्याखालील रीढची अस्थी (हाड) तूटली अन् माझ्या शरीराच्या खालील भागामध्ये अर्धांगवायू निर्माण झाला. त्याचवेळी मी आपल्या सतगुरु देवजी संत रामपालजी महाराजांना आठवले. माझ्या गुरुदेवांच्या दयेने त्याचवेळी दोन्ही पाय व्यवस्थीत काम करू लागले.



**गरीब, कल डरै करतार से, जै जै जगदीश। जौरा जौरी झाडति, पण रज डारै शीश।।**

त्यानंतर मला औरंगाबादच्या खाजगी हॉस्पिटलमध्ये (पटवर्धन हॉस्पीटल) मध्ये घेऊन गेले. जेथे डॉ.डी.जी.पटवर्धनांनी माझ्या शरीराची तपासणी केली. तसेच माझ्या गुडघ्याच्या खालच्या रीढच्या अस्थीचा (हाडाचा) एक्सरे काढला असता रिपोर्ट पाहून डॉक्टर अत्यंत अचंबीत (आश्चर्यचकीत) होऊन म्हणू लागले की, ''आपल्या गुडघ्याखालील रीढची अस्थी (हाड) तुटलेली (फ्रॅक्चर) आहे आणि त्याचा एक तुकडा तूटून वेगळा झालेला आहे''. डॉ.वारंवार माझ्या पायास हात लावून पाहत राहिले आणि म्हटले कि, ''आपणावर परमात्म्याची विशेष कृपा आहे कि, आपले पाय ठीक काम करत आहेत कारण की, ह्या रिपोर्ट नुसार आपणास 'अर्धांगवायू (पॅरालेसीस)' होणे जरूरी होते.'' तेथे त्या हॉस्पीटलमध्ये मी तीन दिवसांपर्यंत दाखल होतो. त्यानंतर मी सूट्टी घेऊन आपल्या घरी पुन्हा हरियाणास आलो. येथे रोहतकमध्ये मी माझा उपचार प्रसिद्ध अस्थीरोग तज्ञ (हाडांचे डॉक्टर) डॉ.चड्डा पासून करण्यास गेलो. डॉ.चड्डा सुद्धा माझा रिपोर्ट पाहून आश्चर्य चकित झाले अन् म्हटले की, ''आपण चालत फिरत कसे काय आहात? आपणास तर रिपोर्टनुसार अर्धांगवायू व्हायला पाहिजे.'' डॉ.चड्डाने पुन्हा रंगीत एक्सरे केला आणि म्हटले कि, ''याचा उपचार करणे असंभव आहे. तसेच ऑपरेशनद्वारे यास ज्या स्थितीमध्ये आाता आहे त्या स्थितीमध्येच थांबून ठेवले जाऊ शकते. कारण हाड (अस्थि) पुन्हा तुटू नये म्हणून.''त्यांनी हाडांना मजबूती येण्यासाठी इंजेक्शने सुरु केली. तीन महिन्यातच संपूर्ण इंजेक्शने झाली. नंतर डॉक्टरांनी म्हटले की, ''ऑपरेशन आवश्य करावे लागेल. अन्यथा उरलेले वाचलेले हाड (अस्थी) सुद्धा तूटू शकते.'' आणि पुढे म्हटले, ''ऑपरेशनचा खर्च दोन लाख रुपये एवढा येईल.'' नंतर त्याचवेळी डॉक्टरांनी सांगितले की, ''रिपोर्टनुसार आपणास तीन महिन्याच्या आत मृत्यू प्राप्त होणार होता. आज आपण परमात्म्याच्या विशेष कृपेनेच जीवीत आहात.'' ऑपरेशनचा खर्च दोन लाख रुपये देण्यास मी असमर्थ होतो. त्यामुळे मी दुसऱ्या डॉक्टरांजवळ उपचारासाठी गेलो. ते सुद्धा माझा रिपोर्ट पाहून आश्चर्यचकित झाले आणि म्हणाले, ''जर ऑपरेशन करण्यास वेळ झाल्यास अस्थी (हाड) आणखी तूटून जातील.'' त्यांनीही सांगितले की, ''रिपोर्ट नुसार आपणास अर्धांगवायू होणे आवश्यक होते. तरीही आपण चालत-फिरत कसे काय आहात?''.

शेवटी माघार घेऊन मी आपल्या गुरुदेव संतरामपालजी महाराजांच्या चरणांवर प्रार्थना केली. तेव्हा माझ्या पूज्य गुरुदेवांनी माझ्यावर दया केली आणि डोक्यावर हात ठेवून म्हटले, ''बाळा आपण नक्की पूर्णपणे ठीक होऊन जाल. जर आज परमेश्वर कबीर साहेबजींच्या शरणामध्ये आपण नसता तर आपणांस कर्म भोगून मृत्यू प्राप्त झाला असता. आपले आयुष्य शेष नव्हते. आपण पुन्हा एकदा डॉक्टरांना दाखवा.'' मी गुरुजींच्या आदेशानुसार दुसऱ्या दिवशी डॉक्टरांना दाखविले, त्यांनी मला पुन्हा एकदा एक्स-रे केला आणि एक्स-रे पाहून डॉक्टर

आश्चर्य चकीतच राहिले. आणि म्हटले की, ''जी अस्थी (हाड) तूटून वेगळे झालेली होती ते आपल्या आपण वर उठून कशी काय जोडली गेली. डॉक्टरांनी सांगितले की, ''ह्या हाडाची अशी स्थिती होती कि, जशी एखादी गाडी अत्यंत अधिक चढावर जात आहे. त्या गाडीच्या इंजीनामध्ये बिघाड झाल्यास ती गाडी परत खाली येऊ शकते किंवा प्रथम गेयर घालून चाकांना दगड इत्यादी लावून तेथेच थांबवता येऊ शकते. पुढे वर चढु शकतच नाही. आपले हाड सुद्धा असेच वर चढून जुडले गेलेले आहे. जे डॉक्टरी इतिहास च्या बाहेरची गोष्ट आहे. ही तर ऑपरेशननेही होऊ शकत नव्हते. ऑपरेशन करून यामध्ये कोणता तरी पदार्थ भरून तो गॅप (अंतर) भरला जाऊ शकत होता. तरीही जर आपण एखादे वजन उचलण्याचे कार्य केले असते तर पुन्हा हाड निसटुन मोडले असते व आपण खाटेवर त्रास भोगून मृत्यू पावला असता. डॉक्टरांना काहीच ते समजत नव्हते. मी म्हटले की, पूर्ण ब्रम्ह कबीर साहेबांचे स्वरूप माझ्या पूज्य गुरुदेव संतरामपालजी महाराजांनी माझ्या पाप कर्मांना नष्ट करून तसेच माझी मृत्यू टाळून आपल्या कोट्यातून मला नवीन जीवन प्रदान केलेले आहे. परमेश्वर कबीर साहेबांची वाणी आहे की:-

**''जो मेरी भक्ति पीछो डी होई, तो हमरा नाम न लेवे कोई।''**

आता मी पूर्ण स्वस्थ आहे. तसेच सदगुरुंच्या चरणामध्ये आत्मकल्याण हेतू जे निस्वार्थ सेवा करीत आहे. ५० किलो ग्रॅम चे वजन स्वत:च उचलून घेऊन चालतो आहे. आमच्या गुरुदेवांचा वास्तविक उद्देश तर 'भक्ति करवून घेऊन जीवांना विकाररहित करून आपल्या परमधामी सतलोकामध्ये घेऊन जाणे' असे आहे. येथील अल्प-अधिक सुख तर आमचे गुरुदेव त्यांच्या स्वत:च्या खजिन्यातून प्रदान करत आहेत कारण त्यामुळे जीव भक्ति मार्गामध्ये लागून राहतील.

म्हणून सर्व समाजास प्रार्थना आहे की, आमच्या गुरुदेवांच्या चरणी येऊन सत्यभक्ती करा व सांसारिक सुखांच्या बरोबर आत्म कल्याणाचाही मार्ग प्राप्त करून घ्या. सत्साहेब!

**विशेष : ऋग्वेद मंडल १० सुकत १६१, मंत्र २**

मध्ये पूर्ण परमात्म्याने म्हटलेले आहे कि, ''हे शास्त्रानुकुल साधना करणाऱ्या साधका, तु संपुर्णभावाने माझे शरण ग्रहण कर अर्थात संशय रहित होऊन माझी भक्ती कर. मी तुझ्या असाध्य रोगासही समाप्त करून टाकीन. जरी तुझे आयुष्य ही शेष नसेल तरी तुझ्या आयुष्याचे श्वास वाढवून शंभर वर्षे करून देईन''.

उपरोक्त सत्य हकीकत प्रभुची समर्थता तसेच स्वयं साधना यास प्रमाणीत करीत आहे.

**- भक्त सुरेंद्र दास**

## प्रभुंनी गरीबांचे ऐकले

मी कर्मवीर, पुत्र श्री. घासीराम, पुत्र श्री. छोटुराम, गाव-भराण, जिल्हा-रोहतक,



हरियाणा येथील कायमचा रहिवाशी आहे. सर्वप्रथम मी व माझ्या पूर्ण परिवाराने सन १९८६ मध्ये निरंकारी बाबा हरदेव सिंहजी महाराजांकडून नाम घेतले. त्यावेळी मी महिलांना बांगड्या परिधान करण्याचे काम करीत होतो. आर्थिक स्थितीही चांगली होती. हळूहळू परिस्थिती बिघडण्यास लागली. नंतर काही दिवसानंतर माझ्या पत्नीच्या शरीरामध्ये अनेक व्याधी निर्माण झाल्या. तिला आतड्यांचा आजार व पित्ताच्या पिशवीमध्ये खडे निर्माण झाले. डॉक्टरांनी ऑपरेशनसाठी वीस हजार रुपये लागतील असे सांगितले. माझ्या या दासाच्या घरी त्यावेळी वीस हजार धान्याचे दाणेही नव्हते अन् मला दम्याच्या व्याधीने ग्रासलेले होते. माझी पत्नी तसेच मी आपल्या कष्टांना आठवून दु:खी मनाने एक आटो रिक्षामध्ये बसून बस स्टँडकडे जाताना चर्चा करीत होतो की, पैसे तर आपल्याजवळ नाहीत आता ऑपरेशन कसे काय होईल? आपण तर आता मरूनच जाऊ.'' त्याच रिक्षामध्ये एक भगिनी (महिला) बसलेली होती. त्यांनी आमच्या सर्व गोष्टी विचारून नंतर म्हटले की, 'तुम्ही करौंचा गावी जावा. तेथे एक महाराजजी आहेत आणि व्याधींवरील औषध फुकट देतात.'' माझी पत्नी भक्तमति मेवादेवी २७-७-२००३ रोजी सतलोक आश्रम करौंचा येथे गेली आणि बंदी छोड सतगुरु रामपालजी महाराज यांची भेट घेऊन आपल्या सर्व आजाराची व गृहस्थितीची वस्तुस्थितीची माहिती सांगितली. सतगुरुदेवांनी अत्यंत प्रेमाने सर्व गोष्टी ऐकल्या आणि म्हटले की, ''मुली, येथे कोणती औषधी वगैरे दिले जात नाही. केवळ आत्मकल्याणाचा मार्ग समजावून दिला जातो. तसेच भक्ति करण्याची विधि पवित्र वेद व पवित्र गीताजी यांच्या आधारावर शास्त्रानुकूल सांगितली जाते. पूर्ण परमात्मा कबीर साहेबजींच्या कृपेने केवळ मंत्र (नाम) जप करूनच सर्व कष्ट दूर होतात. तसेच मूळ लाभ तर जन्म-मृत्यू पासून पूर्णरुपाने जीवाची मुक्तता करण्याचा आहे. समाजसुधार आणि अन्य सुख तर सोबत अर्थात निशुल्क स्वयं होऊन जाते.'' राम नामाचे औषध देऊन सदगुरु रामपालजी महाराजांनी माझ्यां सर्व परिवारास कृतार्थ केले. आता आम्ही प्रेमपूर्वक जीवन व्यतीत करीत आहोत. सर्व व्याधी नामस्मरणाने व गुरुदेवांच्या आशीर्वादाने समाप्त झाल्यां. आम्ही बंदीछोड यांच्याकडे मागतो(विनंती करतो) की, ''परमात्मा, जसे सुखी जीवन आम्हास दिलेले आहे, तसेच सर्वांना प्रदान करावे.''

भक्त कर्मवीर दासपुत्र **श्री. घासीराम,**
गाव-भराण, ता.महम, जि.रोहतक, हरीयाणा.

## भगवान असावा तर असा

मी भक्त महावीर सिंह पुत्र श्री केहरसिंह, गाव- ढराणा जिल्हा-झज्जर (हरियाणा) येथील रहिवासी आहे. पूर्वी मी शिवजींचा कट्टर भक्त होतो. माझ्या लीव्हर (यकृत) आणि मुत्रपिंडा मध्ये जखमा होऊन पू झालेला होता. माझे बंधू भक्त महेंद्रसिंह यांनी मला औषध उपचारासाठी हॉस्पीटलमध्ये घेऊन गेले. त्यापुर्वीही बराच पैसा खर्च केलेला होता. पण कोणताच

गुण (आराम) नव्हता. हॉस्पीटल मध्ये अल्ट्रासाऊंड सोनोग्राफी केल्यानंतर तिन ऑपरेशन करावे लागतील असे सांगितले गेले. मी घाबरलो. मी ऑपरेशन करण्यांसाठी नकार दिला. भोजनही जात नव्हते. प्रकृती अगदी नाजूक झालेली होती. माझा जेष्ठ बंधू श्री महेंद्रजी म्हणत असे कि, ''आपण संत रामपालजी महाराजांकडून उपदेश घ्या. ते पूर्ण परमात्म्याचे अवतार आलेले आहेत. कबीर परमेश्वर पूर्णब्रह्म आहेत. मी म्हणत होतो की, 'शिव भगवानासमोर तुझ्या कबीर विणकराची (कोष्टयाची) काय पात्रता आहे? कबीर तर एक कवि होता, तो भगवान होऊ शकत नाही.''

माझे मोठे बंधु महेंद्र सिंह पुत्र श्री केहर सिंह याचा परिवार एकदम उघड्यावर पडला होता. संतरामपाल महाराज यांच्या शरणात गेल्यानेच ते पूर्ण सुखी आहेत. त्यांनी पूर्वीच्या सर्व पूजा त्यागल्या होत्या. ते तरीही अत्यंत सुखी आहेत. मी ही मानत होतो. परंतु तरीही मी आपल्या भगवान शिवजीपेक्षा अधिक अन्यकोणासही मानत नव्हतो. माझा जेष्ठ बंधु महेंद्र मला म्हणत असे, 'महावीर, हीच चुक सर्वांची होत आहे. पूर्ण ब्रह्म कविर्देव (कबीर परमेश्वर) हेच आहेत. त्यांच्या शक्तीसमोर ब्रह्मा-विष्णू-महेश, ब्रह्म तथा परमब्रह्म तर अत्यंत न्यून शक्तीयुक्त आहेत. जसे देशाचे प्रधान मंत्री व राष्ट्रपति यांच्या समोर प्रांताच्या मंत्रीची शक्ती असते. त्याप्रमाणे अंतर परमेश्वर कबीरजी (राष्ट्रपती अथवा प्रधानमंत्री) जाणा व शिवजी (एक विभागीय मंत्री जाना) च्या शक्तीमध्ये आहे. आता आपण स्वयंच विचार करा कि, ''कोठे ठांठां (कविर्देव/कबीर परमेश्वर) अन् कोठे म्यां म्यां (भगवान शिवजी) अर्थात सिंहाच्या तुलनेत बकरे. पूर्ण संत रामपालजी महाराजांनी सर्व सद्ग्रंथांचे गहन (सखोल) अध्यायन केलेले आहे. तथा भक्ती शक्ति ने स्व अनुभवाने भक्ति योग्य ज्ञान निर्माण केलेले आहे. तेव्हा त्यांनी आपली ज्युनिअर इंजिनिअर ही नोकरी त्यागून भक्ती मैदानामध्ये उतरलेले आहेत. आज सर्व संत व महंत तसेच आचार्यांना मागे टाकलेले आहे. सर्व पंथ व महर्षि दयानंद सारख्यांनाही त्यांच्याच लेखांद्वारे नापास (असफल) करून टाकलेले आहे. वर्तमानपत्रांमध्येही जाहीररित्या सर्वांना ललकारले आहे. तरीही कोणी काहीही बोलू शकत नाही. आर्य समाजाच्या काही अज्ञानांनी विरोध केलेला होता, त्यांना माघार घ्यावी लागली. कारण पुर्ण संत रामपालजी महाराज प्रमाणांसहित वक्तव्य करतात. अन्य केवळ निराधार दंत कथांच्या आधारावरच मार्गदर्शन करत आहेत. सत्याच्या समोर असत्य टिकूच शकत नाही.

जेष्ठ बंधू महेंद्रचे हे वक्तव्य ऐकून मनामध्ये यायचे कि, वाद भांडणे करावे, परंतु जेष्ठ (मोठे) असल्याच्या नात्याने मी काहीच बोलत नव्हतो. कोणी दुसरा म्हटला असता कि, ''कोठे ठांठां (कबीर परमेश्वर) अन कोठे म्यांम्यां (भगवान शिवजी) तर मी (महावीर) अवश्य भांडण (युद्ध) केले असते. परंतु आता समजले की, 'खरच कबीरजी पूर्ण परमेश्वरच आहेत. मरणारा काय नाही करणार? त्या दिवशी मी आपल्या बंधू महेंद्रास म्हटले कि, ''माझा जीव वाचवा माझ्या बंधुने महेंद्राने म्हटले कि, करौंथा आश्रमास चल, तुझा जीव (प्राण) तेथेच वाचू शकतो.



मला ऑपरेशन थिअेटर मध्ये घेऊन जाण्यासाठी ट्रॉलीवर झोपवले गेले. तसेच ऑपरेशन करण्यासाठी लागणारी वस्त्रे मला परिधान केली गेली. मी उठून ऑपरेशन साठीची ती वस्त्रे काढून आपली वस्त्रे परीधान करून माझ्या बंधूस म्हटले की,''मी नाम घेणार''. आम्ही गाडी करून रोहतकमधील हॉस्पिटल पासून सरळ बंदी छोड सद्गुरु रामपालजी महारांजांच्या शरणामध्ये आलो. मी नामउपदेश घेतला. त्यावेळी आश्रमामध्ये भोजन प्राप्त केले. नंतर मी पुन्हा हॉस्पिटलमध्ये गेलो आणि तपासणी करून घेतली. माझ्या तपासणी नंतर डॉक्टर आश्चर्यामध्ये पडले. त्यांना माझ्यामध्ये कोणताच आजार (व्याधी) आढळून आली नाही. मी स्वस्थ झोपलेलो होतो. माझा आश्रमामध्ये काहीच खर्च झाला नाही. नाम तथा मंत्र जापाची पुस्तिका मुफ्त प्राप्त झाली. माझा सर्व परिवार अन्य देव-देवातांची पूजा पाठ करत असे, परंतु उपदेश घेतल्यानंतर सर्व त्याग केले. पूर्वीपेक्षा अधिक सुखी व स्वस्थ, मी व माझा परिवार झालेलो आहोत. बंदी छोड पूर्ण परमात्मा सद्गुरु रामपालजी महाराजांचे दिवस रात्र आम्ही गुणगाण करीत आहोत.

संत रामपालजी महाराज यांचा उद्देश तर नाम उपदेश देऊन भक्ति करवून काळाच्या जाळ्यामधून जीवास मुक्त करवणे असे आहे. समाज सुधार व अन्य सुख तर आपोआप अर्थात स्वयंच होऊन जाते.

''सत साहेब'' **-भक्त महावीर**

## ''लुटले गेलेल्यांना आधार''

मी भक्त जीयाराम (राजू), पुत्र श्री. गणेशी राम, गाठ-ढराणा येथील रहिवासी आहे. मला अन् माझ्या पत्नीस असाध्य रोग झालेला होता. कोणी आरोप-प्रत्यारोप करत होते. डॉक्टरांनी टी.बी.(क्षयरोग) म्हणून सांगितले होते. आम्ही डॉक्टरांच्याकडून तसेच औषध-उपचार करून घेतले. तसेच देवी-देवतांचे अतिशय पूजा-पाठ केले. अन् उत्तर प्रदेश, हरियाणा, राजस्थान येथील बालाजी इत्यादी स्थानांच्या देव स्थानी भक्ति तसेच उपचारांसाठी गेलो. पुष्कळ धन ही खर्च केलेत. कमीतकमी दोन लाख रुपये खर्च केले असतील. पण कोणत्याच उपचाराने काहीच आराम मिळाला नाही. आम्ही त्रासाने वैतागून गेलेलो होतो. मी अत्यंत निर्धन झालो. ५० रुपये कमवायचो आणि १०० रुपये खर्च व्हायचे. अनेक वेळा आत्महत्या करण्याचा विचार मनामध्ये आला. होमहवनही करवून घेतले. हवन करतेवेळी पंडीत घाबरला अन् म्हणाला की, ''याच्या आत अत्यंत मोठा पिशाच्च (जिंद) आहे.'' पंडीत म्हटला की, 'मी पुन्हा होम हवन करेन अन् नंतर सांगेन.' भक्त महेंद्र पुत्र श्री केहर सिंह (जो माझ्या गावचा रहिवाशी आहे) त्याने संतरामपालजी महाराज यांच्याकडून नामउपदेश घेतलेला होता. मला अनेक वेळा म्हणत असे कि, 'जीयाराम, कोठेही फिर आणि ठगांपासून (अयोग्य महाराजांच्याकडून) स्वत:च लूटून घे, संतरामपालजी महाराजविना कष्ट निवारण होऊच शकणार

नाही.'' भक्त महेंद्र म्हणत असे कि, ''मी ही सर्व ठिकाणी भटकून तथा लुटले जाऊन शेवटी पूर्ण संत रामपालजी महारांजच्या आशीर्वादाने व त्यांच्याद्वारे प्रदान केलेल्या नाम उपदेशाने स्वस्थ सुखी झालेलो आहे.'' मी भक्त महेंद्रशी म्हणत असे, ''करौंथा येथील आश्रम तर आत्ताच बनलेलाआहे. मी तर मोठ-मोठ्या मंदिरांमध्ये जाऊन आलेलो आहे. परंतु मी त्रासाने वैतागुन भक्त महेंद्रास भेटलो. दुसऱ्या दिवशीच आम्ही भक्त महेंद्रासोबत करौंचा येथील सतलोक आश्रमात जाऊन सत्‌गुरु रामपालजी महाराजांकडून विनामुल्य नाम उपदेश प्राप्त केला आणि उपदेश प्राप्त झाल्यानंतर आम्ही पूर्णपणे स्वस्थ झालो. 'सन २००५' मध्ये आम्ही नामउपदेश घेऊन जवळजवळ दोन वर्षे झालेली आहेत. आता आमचा संपूर्ण परिवार स्वस्थ आहे. आम्ही दिवस रात्र पूर्ण परमात्मा बंदी छोड सद्‌गुरु रामपालजी महाराज यांचेच गुणगाण करीत आहोत.

पुर्ण संत रामपालजी महाराज यांचा मुख्य उद्देश तर नाम उपदेश देऊन भक्ती करवून घेऊन काळाच्या या जाळयातून मुक्त करण्याचा आहे. समाज सुधारणा व अन्य सुखे आपोआपच अर्थात स्वत:च प्राप्त होऊन जातात ''सतसाहेब''.

**– भक्त जियाराम**

## ''संत असावा तर असा''

मी शशीप्रभा प्रधानाचार्या (प्रिंसीपल) राजकीय वरिष्ठ माध्यमिक विद्यालय डिगाना, जिल्हा,जीन्द, हरीयाणा. येथे कार्यरत आहे. मी माझ्या घरातील भांडणे, मानसीक तणाव यांनी जवळजवळ ३५ वर्षे चिंताग्रस्त होते. पती मारत असे. सर्व वेतन हिसकावून घेत असे. आणि जेवढा त्रास देता येईल तेवढा त्रास देत असे. ३२ किल्ले जमिनीचे, मालक असून आम्हांस नेहमी कुत्र्यासमान भाकरी टाकत असे. मी त्याच्या तथा माझ्या सर्व नातलगांकडून मदत मागितली. मी समाजातील पंचायतीच्या सदस्यांकडून मदत मागितली. मला कोणीही साथ दिली नाही. संत बिघडलेल्या कार्यास सावरतात. असा विचार करून मी आनंदपूर (बीना) मध्यप्रदेश येथील गुरु करून घेतले. परंतु घरामध्ये तोच कलेश होत होता. माझ्या कन्यांना परमात्म्याच्या दयेने स्वत:च्या हिंमतीवर शिक्षण दिले. आता त्यांचा विवाह होत नव्हता. त्यांच्या वडिलांनी विवाहस्थळे पाहण्याचे बंद केले. आता ह्याच त्रासाच्या कारणाने मी बालाजीस गेले. बगड (राजस्थान), धौलीधार (हिमाचल प्रदेश) येथेही गेले. पीर-फकीर, गुरुद्वारे यांचा आधार घेतला. घरामध्ये जेव्हा एकटी असायची तेव्हा रडत असे की,''धरतीवर कोणी परमात्मा आहेत की नाही?'' अन्याय आणि जुलुम सहन करता करता माझी स्थिती वेड्यासमान झालेली होती.

त्यानंतर एक दिवस ही दु:खी आत्मा त्या परमात्म्याच्या दरबारापर्यंत पोहचली जे दु:खनिवारण करतात. आमच्या शेजारी सदगुरुंचा पाठ (पुजा) झाला. माझी शेजारीन मला प्रसाद घेण्यासाठी निमंत्रण घेऊन माझ्या घरी आली. तिथे गेल्यानंतर संवाद झाला. पाठ (पूजा) विषयी सांगितले कि, हा पाठ परमात्माची सत्य वाणी आहे, ज्याने दु:ख नष्ट होतात. परंतु हा



पाठ केवळ संत रामपालजींच्या आज्ञेनुसार करवून घेतल्यानेच लाभ होतो. अन्य कोणाकडून पाठ केल्याने कोणताच लाभ होत नाही. जसे राजा परिक्षीतास कथा ऐकवताना कोणत्याही ऋषीने पाठ (कथा) करण्याची हिंमत केली नाही. कारण ते अनअधिकारी होते. तसेच सातव्या दिवशी परिणाम मिळणार होता. यासाठीच स्वर्गातून ऋषीसुखदेवजी आले. त्यांनी राजा परिक्षितास नाम देऊन (शिष्य बनवून) सात दिवसापर्यंत कथा (पाठ) केली. तेव्हा राजा परिक्षीतास थोडीशी विश्रांती मिळाली. वर्तमानामध्ये कोणीही वास्तविक ज्ञान व सत्यसाधना परिचित नाही. त्यामुळे कोणीही पाठ केल्यास त्याने साधकास कोणताच लाभ होणार नाही. ती भगिनी जिच्याशी माझी चर्चा झाली, संतरामपालजी महाराजांचे विचार ऐकवत असे तिने अशिक्षित असूनही शास्त्राचे गुढ रहस्य संत रामपालजी महाराजांकडून ऐकलेले ऐकवले. मी प्रधान आचार्या (प्रिंसीपल) असुनही अचंबीत झाले. असे वाटले, परमात्मा माझा हात पकडत आहेत. त्या भगिनीनी सांगितले कि, ''आमचे गुरुजी दु:खांचे निवारण करतात'' मी तिला म्हटले, ''आपण मला आपल्या गुरुजींचे दर्शन करवू शकता?'' परमात्म्याच्या दयेने दुसऱ्याच दिवशी सद्‌गुरु रामपालजी महाराजजींना साधारणशा खुर्चीवर बसलेले पाहिले. मी जाणत नव्हते कि, संत काय असतात. त्यांची महिमा काय असते? जे जेवढे उच्चं असतात, ते तितकेच साधारण दिसतात. आमचे स्थान तर धरतीच्याही खाली आहे. आम्ही परमात्म्याच्या महिमेस काय समजणार. माझ्या गुरुजींनी माझी व्यथा ऐकली आणि म्हटले, ''आपण नाम उपदेश घ्या. सर्व काही ठिक होईल.'' दुसऱ्याच दिवशी मला नाम उपदेश प्राप्त झाला. एका महिन्याच्या आतच कन्येच्या विवाहासाठी चांगले स्थळ आले अन् नंतर विवाह ही झाला. मला वाटले की, अशक्य होते ते शक्य कसे काय झाले? ही चमत्कारीक गोष्टच घडलेली आहे. ज्याने प्रथमत: विवाहास नकार दिलेला होता तोच वर, आज चक्क विवाहच करत आहे.'' नंतर काही दिवसानंतर माझ्या मोठ्या कन्येच्या पोटामध्ये रिसौली (कॅन्सर) ही व्याधी झाली. अद्याप मुलबालही नव्हते. त्यामुळे चिंता वाटू लागली. मी आपल्या पुत्रास म्हटले की, 'तु पाहिलेले आहे ना जेव्हा आपण चित्रपट पाहत असतो तेव्हा इकडे परमात्म्याची प्रार्थना केली जाते. अन् तिकडे एखाद्या व्यक्तीचे ऑपरेशन यशस्वी होते.'' तो माझ्या गोष्टीशी सहमत झाला आणि मी ताजपूर (दिल्ली) सद्‌गुरुंच्या सत्संगामध्ये सेवेसाठी गेले. तेथून मी हॉस्पिटलमध्ये कन्येजवळ गेले. ऑपरेशन ठिक झाले जी शंका कॅन्सरची होती, तीच ठीक झाली. नंतर कन्या गर्भवतीही झाली. त्यातच जावयाचा एक ट्रॅक्टर व मोटरसायकल दुर्घटनेची बातमी कळाली. मला तर माझ्या पुज्य गुरुदेवजींच्या अतिरिक्त अन्य काहीच सुचत नव्हते. परमात्म्याची जेवढी महिमा गाऊ ती थोडीच आहे. या जीभेने (वाचेने) जेवढी महिमा मी लोकांना सांगु तेवढी थोडीच आहे. दिड महिन्यांच्या आत ठीक होऊन जावई घरी आले. हे जगत, काय समजणार कि माझी प्रार्थना परमात्मा ऐकतात.

ज्या दिवसापासून मी हा उपदेश घेतलेला आहे तेव्हापासून मी खोट्या संतांच्या प्रतीमा (फोटो) आपल्या अंगणामध्ये टाकून स्वाहा करून टाकल्या. त्या दिवसापासून माझ्या जीवनाची गाडीही रुळावर आली. '२३ सप्टेंबर २००३' रोजी मी माझ्या जागृत नेत्रांनी ४ ते ५ वाजता एक भयानक आकृती पाहिली. एवढ्या भयंकर आकृतीचा व्यक्ती होता कि, जर नाम घेतलेले नसते तर माझे हृदय फाटले असते. परंतू मला त्या समयी भयच वाटले नाही. परंतु हा विश्वास झाला की, ''हा यमदूत आहे'' दुसऱ्याच दिवशी मी आपल्या गुरुजींना सांगितले. त्यांनी हे स्पष्ट केले कि, ''माझे त्या दिवशीच श्वास पूर्ण झालेले होते.'' आता मी आपल्या परमात्मा स्वरूप गुरुजींच्या दयेनेच जीवन जगत आहे. त्यांच्याच कृपेने कनिष्ठ कन्येचा विवाह एका इंजिनिअर मुलाबरोबर मागील वर्षी झाला. दोन तीन वेळा माझी नोकरी जाण्याचीही आशंका होती. परंतु नंतर माझ्या परमात्म्याने मला सांभाळले. मला दोन पदोन्नती प्राप्त झाल्या. संतरामपालजी महाराज म्हणतात की, ''राजा सुद्धा प्रभुचाच बालक असतो. त्याच्यामध्ये सुद्धा प्रभुंची शक्ती कार्य करीत असते. परमेश्वरच आपल्या साधकासाठी राजामध्ये प्रेरणा निर्माण करुन सर्व फेरबदल करीत असतात. मात्र कर्म करताना राजा दृष्टीगत होतो. परंतु कर्ता करवीता परमात्माच आहे. कोणीही माझ्या सद्‌गुरु रामपालजी महाराजांचा आधार घेऊन पाहा, त्यांचे अशाप्रकारेच काटे (कष्ट) निघतील (नष्ट होतील) जसे माझे कष्ट नष्ट झालेले आहेत. परमात्मा खरच अनाधारांना आधार देतात, आत्म्यांचा आवाज ऐकतात, माझ्यासोबत ह्या काही वर्षात जे काही झालेले आहे, त्यास केवळ परमात्माच करू शकता, माझ्या सद्‌गुरुंची महिमा वर्णन करण्यासाठी माझ्याकडे शब्द नाहीत. हे स्वयंच कबीर साहेबांचे अवतार आहेत. जे परमात्म्याचे दर्शन (कृपा) इच्छितात त्यांनी करौंथा आश्रम जिल्हा-रोहतक, बरवाला आश्रम, जिल्हा-हिसार, हरियाणा येथे येण्याचे विसरू नका. मला ह्या अल्पशा जीवास तुम्ही कसे काय उभारले? कोणत्या शब्दांत आपली महिमा गाऊ? ह्या शब्दांना वाचकांनो, आपल्या हृदयामध्ये उतरवून घ्या. आणि लाभ प्राप्त करून घ्यावे.

अत्यंत तुच्छ प्राणी-**भक्तमति शशी**
मो. : ९४६६३६८५८४, ९३५५१२२१११

## ''आपल्या भक्तास धर्मराजाच्या दरबारातून मुक्त करणे.''

मी भक्त ओमप्रकाश सुपुत्र श्री मातादीन नजफगड, दिल्ली येथील रहिवाशी आहे. मला परमपूज्य संत रामपालजी महाराज यांच्याकडून नाम घेऊन दिड वर्षे झालेली आहेत. माझे नजफगड मध्ये हलवाईचे (मिठाई) दुकान आहे. '१९ मे २००५' रोजी रात्री ९.३० वाजता मला अचानक दुकानामध्येच पोटात आत्यंतीक उदरवेदना सुरु झाल्या. वेदनांच्या कारणाने माझी प्रकृति एकदमच खराब झालेली होती. मी गुरुजींनी दिलेले नाम (मंत्र) जपत जपत घरी पोहोचलो. घरामध्ये प्रवेश करतानाच समोरील सदगुरुजींच्या प्रतिमेपुढे दंडवत प्रणाम केलाा. मी



दंडवत प्रणाम करून उभा झालो तर मला उदरवेदना जाणवल्याच नाहीत. नंतर मी कॉट (चारपाई) वर झोपलो. कॉटवर झोपताच बैशुद्ध झालो. तेव्हा माझ्या चारी दिशांना यमदूत फेऱ्या मारुन मला भिती दाखवत होते. मी भितीनेच बेशुदध झालो. लगेचच माझ्यावर पांढरी चादर टाकून मला उचलून यमराज दरबारामध्ये घेऊन गेले. यमराजाच्या दरबारामध्ये मी पाहिले की, 'तिथे रांगच लागलेली होती. जेव्हा माझा नंबर आला तेव्हा यमराजा म्हटले की, ''यास तलावामध्ये फेकून द्या.'' मी तलावाकडे दृष्टी टाकली तर मला तलावामध्ये मगरीच मगरी दिसल्या. मी त्यांना पाहून भयभीत झालो. तेव्हा मी आपल्या परमपुज्य सदगुरु रामपालजी महाराजांचे स्मरण केले. त्या समयी धर्मराजाचे दूत मला तलावामध्ये फेकण्यासाठी तयार झालेत. मी गुरुजींना हाक मारुन पुकारले की,- ''गुरुजी, मला वाचवा.'' तेव्हा मी पाहिले की, माझे गुरुजी कबीर साहेबांच्या रुपामध्ये आले अन् मला तलावात पडण्यापूर्वीच बाहेर काढले. यमराजाने कबीर साहेबांच्या चरणामध्ये पडून दंडवत प्रणाम केला. नंतर गुरुजी आपल्या रुपामध्ये आले आणि मला म्हणाले की, ''आता तर मी तुझ्या बरोबर आहे''. तेव्हा माझी भिती दूर झाली. धर्मराजाने गुरुजींशी वाद केला की, '''आपण यांस वारंवार का वाचवत आहात? हा तर माझे भोजन आहे. आपण यास पूर्वीही दोन वेळा वाचविलेले आहे. प्रथम वेळीतर स्कूटर आणि जिप यांची समोरासमोर धडक होऊन मला साधे खरचटले सुद्धा नव्हते आणि दुसऱ्या वेळेस मोटारसाईकल स्लिप झाल्याने मी चालत्या ट्रक खाली येऊन पडलेलो होतो. गुरदेवजींनी मला त्या ट्रकखाली सापडण्यातून वाचविले.''.

तेव्हा गुरुदेवजींनी धर्मराजास म्हणाले की, ''याने माझी पूर्वजन्मी भक्ती केलेली होती. ह्यामुळेच मी यास वाचविले.'' नंतर धर्मराजाने म्हटले की, ''यावेळी आपण यास का वाचविले? मी तर याचे नाम तोडून ठेवलेले होते.'' नंतर गुरुजी म्हटले कि, ''त्याचे नाम आपण तोडलेले होते, याने आपल्या मर्जीने तोडलेले नाही. यामुळेच मी यास वाचविले. हा माझी भक्ति करत आहे''. तेहा धर्मराज (काळ) म्हटला कि, ''मी पाहतो की आपण याला कुठपर्यंत वाचवता''. नंतर गुरुजी म्हटले की, ''मी क्षणोक्षणी याच्यासोबतच आहे. तू याचे काहीच बिघडवू शकत नाहीस''.

नंतर सतगुरूदेवजींनी धर्मराजास म्हटले कि, ''यानंतर याला कोणत्याही प्रकारचे कष्ट दिलेस तर, जसे तू लोकांना सतावतोस त्यापेक्षाही वाईट तूझे हाल करेन.''

त्यानंतर सत्‌गुरुदेवांनी मला धर्मराजाच्या दरबारातून खाली घेऊन आणले. आणि मला सांगितले की, ''तू लवकरात लवकर आपल्या घरच्यांना सांग कि, ''तू एकदम ठीक आहेस. घरी घेऊन चलावे''. दोन डॉक्टरांनी तर मान्यच केले होते कि, ''ही तर आमच्या क्षमतेच्या बाहेरची गोष्ट आहे''. माझे घरवाले मला हॉस्पीटलमध्ये घेऊन जात होते. तेव्हाच मी त्यांना सांगितले की, ''मला ताबडतोब घरी घेऊन चला, मी एकदम ठीक आहे''. जे

माझ्यासोबत होते ते तर एकदम आश्चर्यचकीत झाले की, हा तर मृत्यू पावला होता. यास शुद्धी कशी काय आली? हा असे काय म्हणत आहे? नंतर माझ्या घरचे रस्त्यामधून पुन्हा घराकडे येऊ लागले. तेव्हा मला सद्गुरु कमळाच्या फुलांवर विराजमान झालेले दिसले. कधी गुरुजींच्या रुपात तर कधी कबीरसाहेबांच्या रुपामध्ये दिसत होते. आणि माझ्याकडे हात हालवत जात असल्याचे दिसत होते. नंतर मी जोर जोराने रडायला लागलो कि, ''माझे गुरुजी येऊन गेले, माझे गुरुजी येऊन गेलेत.'' माझ्या घरचे पुन्हा भयभीत झाले की, ''हा असा कसा करत आहे. नंतर ते मला दवाखान्याच्या दिशेने घेऊन जाऊ लागले. तेव्हा गुरुजींनी मला आवाज दिला की, ''भक्त, तू हे काय करीत आहेस? मी तर तुला घरी ताबडतोब जाण्यास सांगितलेले आहे.'' नंतर मी घरच्यांना समजावून सांगितले की, ''मी एकदम ठीक आहे. मला माझे गुरुजी दृष्टीप्रत झालेले होते.'' तेव्हा माझ्या घरचे मला घेऊन घरी आले. आणि घरचे सर्वजण आश्चर्यचकित होऊन विचारात पडले की, ''हा तर मृत्यू पावलेला होता, हा जिवंत कसा काय झाला?

मी आपल्या घरच्यांना माझ्या सोबत घडलेली सर्व घटना सांगितली कि, माझ्या सोबत असे असे घडले आणि माझ्या सद्गुरुदेवांनी मला वाचवून घरी सोडून गेले.

**भक्त ओमप्रकाश दास**

आर.झेड.२-१५, बी ब्लॉक, गल्ली नं.२, मकसूदा बाद कॉलनी,

नजफगढ, नवी दिल्ली.

## 'पूर्ण परमात्मा साधकास भयंकर रोगातून मुक्त करून आयुष्य वाढवून देतात'

भक्त डॉ. ओमप्रकाश हुड्डा (सी.एम.ओ.) यांचे प्रमाण

प्रमाण ऋग्वेद मंडल १० सूक्त नं.१६१ मंत्र १, २, तथा ५ ज्यामध्ये परमेश्वर म्हणतात कि, जर कोणास प्रत्यक्ष किंवा गुप्त पणे क्षय रोग झालेला असेल त्यासही ठीक करतो. तसेच जर कोण्या रोगी व्यक्तीची प्राणशक्ती क्षीण झालेली असेल, ज्याची आयु (आयुष्य) शेष राहीले नसेल. त्या व्यक्तीच्या (तुझ्या) प्राणांची रक्षा करून देतो, तसेच त्या व्यक्तीची (तुझी) आयु शंभर वर्षे प्रदान करून देतो. अन् सर्व सुख प्रदान करतो.

मंत्र ५ मध्ये म्हटलेले आहे कि, ''हे पुनर्जीवन प्राप्त प्राणी, त सर्वभावाने माझे शरण ग्रहण कर, जर पापकर्म दंडाच्या कारणाने तुझे नेत्रच नष्ट (अंध) होणार असतील तर मी तुला पुन्हा आजीवन नेत्रदान करून देतो. तुझे रोग समाप्त करुन सर्व अंगे प्रदान करून देतो. तथा तूला प्राप्त होऊन जाईल, अर्थात मिळेल.''

**जम जौरा जासे डरें, मिटें कर्म के लेख।**
**अदली अदल कबीर है, कुल के सतगुरु एक।।**



वरील ओळी, माझ्या जीवनामध्ये पूर्व रुपाने सत्य घटित झालेल्या आहेत.

मी भक्त डॉ. ओमप्रकाश हुड्डा सी.एम.ओ. एम.बी.बी.एस. एम.एस.(नेत्ररोग तज्ञ) १८ ए, सरकुलर रोड, रोहतक येथील रहिवाशी आहे. माझा जन्म १२ एप्रिल १९५३, मध्ये गाव 'किलोई' जिल्हा-रोहतक येथे झाला. माझे ५ वी ते १२ वी पर्यंतचे शिक्षण 'डी.ए.व्ही.' हायस्कूल व डी.ए.व्ही. महाविद्यालय अमृतसर मध्ये झाले. अमृतसरमध्ये माझे जेष्ठ बंधु डी.ए.व्ही. हायस्कूलमध्ये ग्रंथपालपदी कार्यरत होते. तेथील जाणकार लोक त्यांना 'मास्तरजी' तसेच मला प्रेमाने 'छोटे मास्तरजी' असे म्हणत असे जेव्हा मी सहावी इयत्तेत शिकत होतो. तेव्हा एका महात्म्याने जे 'दुरग्याना मंदिर' अमृतसर मध्ये सेवक होते. त्यांनी माझ्या हस्तेरेखा पाहून सांगतले होते कि,''छोटे मास्तरजी, आपण डॉक्टर होणार आणि तुमचे आयुष्य एकच पन्नास वर्षे इतके आहे?'' हे सांगून ते भयभीत झाले की, मुलास सत्यभाष्य कडून चुक केलेली आहे. परंतु मी त्या महात्म्यांच्या भाष्याला एक बालकाप्रमाणे ऐकले अन न ऐकल्यासारखे सोडून दिले. मी मोठा होऊन डॉक्टरच झालो. तसेच मी एम.बी.बी.एस. आणि एम.एस. (नेत्ररोग विशेष तज्ञ) पी.जी.आय.एम.एस. रोहतक मधून काम केलेले आहे.

ठीक ५० वर्षे पूर्ण जेव्हा होणार होते. तेव्हा १०-११ एप्रिल २००३ च्या रात्री बाराच्या दरम्यान मी सहपरीवार रोहतक मध्येच होतो. तेव्हा मला दोन्ही हातामध्ये वेदना तसेच हृदयामध्ये जडपणा होण्यास सुरु झाले आणि आम्ही उपचारासाठी पी.जी.आय.एम.एस. हॉस्पीटलमध्ये गेलो. यापूर्वी कधीही मला ब्लेड प्रेशरचा (उच्चरक्त दाब) व्याधी नव्हता. आणि न मधुमेहाची व्याधी होती. मी नाम घेण्यापूर्वी सतत धुम्रपान अवश्य केलेले होते.

तेथे ड्युटीवरील कार्यरत डॉक्टरांना मी परीचय करुन दिला की, एच.सी.एम.एस.आय. (ग्रुप ए) श्रेणीमध्ये सी.एम.ओ. पदावर कार्यरत आहे. परिचय दिल्यानंतर डॉक्टरने लगेच उचित निरक्षणानंतर माझ्यावर उपचार सुरु केले आणि अतिदक्षता युनीटमध्ये (आयसीयु) मध्ये हलवले. इथपर्यंत मला सर्व गतिविधी समजल्या. परंतु आयसीयु मध्ये शिफ्ट केल्यानंतर मला काहीच माहित झाले नाही की पुढे काय झाले? जवळजवळ दीड ते दोन तासानंतर मला जाणवले की, मला काळाचे (यमाचे) दुत चारी दिशांनी घेरून उभे आहेत. ''चल, तुझा येथील समय पूर्ण झालेला आहे. अन् आम्ही तूला नेण्यासाठी आलेलो आहोत. मी त्यांना काहीच म्हणू शकलो नाही. तेवढ्यातच पूर्ण परमेश्वर कबीर साहेब माझ्या सद्गुरु तत्वदर्शी संत रामपालजी महाराजांच्या रुपामध्ये बेडजवळ प्रकट झाले. तेव्हा ते काळाचे दूत, ज्यांचे चेहरे प्रथमत: भयानक तथा शरीर भयंकर अन् दीर्घ होते, महाराजजींना पाहूनच अदृश्य झाले. ''

माझ्या सद्गुरु देवांनी मला आशीर्वाद दिला आणि म्हटले कि, ''कबीर परमेश्वरांनी आपले आयुष्य त्यांच्या कोठ्यातून (त्यांच्या शक्तीने) वाढवून दिलेले आहे. कारण आपण

सत्‌भक्ती पूर्ण करु शकाल आणि सतलोकी जाऊ शकाल.'' मी रडत म्हणलो, ''मालक स्वामी, आपणंच स्वयं परमेश्वर आहात, आपणं ह्या चोल्यामध्ये (शरीररुपी वस्त्रामध्ये) स्वत:ला लपवलेले आहे. परमेश्वर भक्तीही आपणच करून घेणार आहात. मी भक्ती करणार कोण आहे?'' एवढे म्हणून माझे डोळे उघडले आणि माझ्या डोळ्यातून अश्रुंशिवाय दुसरे काहीही नव्हते. तीन दिवसानंतर जेव्हा आय.सी.यु. मधून मला वॉर्डामध्ये आणले जात होते. तेव्हा मी उठून पायी चालू लागलो. तेव्हा एक डॉक्टरांनी पळत येऊन मला पकडले. अन् म्हटले की, ''काय करीत आहात? आपण पायी अजिबात चालायचे नाही. आपणास हार्ट अ‍ॅटॅक (हृदयाचा धक्का) येवून गेला आहे''.

स्पेशल वॉर्ड मध्ये शिफ्ट केल्यानंतर डॉक्टरांनी सांगितले की, ''आम्ही हैराण आहोत कि १०/११ तारखेच्या रात्री आपला इ.सी.जी./बी.पी. इत्यादी रिपोर्ट सांगत होते की, आपण वाचणारच नाही. परंतु प्रात: इ.सी.जी. इत्यादी पुन्हा सामान्यपणे सुरु झालेत.''

मी दि.२५-१२-१९९९ रोजी संत रामपालजी महाराजांकडून नाम उपदेश प्राप्त करुन घेतलेला होता. यापूर्वीही मी ब्रम्हाकुमारी, जैनी राधास्वामी यांचा शिष्य होतो. तसेच डी.ए.व्ही. हायस्कूल/महाविद्यालयाचा विद्यार्थी असल्याने आर्य समाजाचा पगडा (छाप) माझ्यावर होता. मी गायत्री मंत्रांचा जप कित्येक लाख वेळा केला असेल. घरामध्ये जवळ जवळ शंभर प्रतिमा (फोटो) सर्व देवी-देवतांचे होते. नामदानानंतर सर्व देवदेवतांचे त्या प्रतिमा पाण्यामध्ये विसर्जीत करुन दिल्या. तथा सर्व प्रकारची अन्य उपासना बंद केली. तसेच सत्गुरु रामपालजी महाराजांच्या आदेशानुसार पूर्ण परमात्मा कबीर परमेश्वर (कविर्देव) यांची भक्ति सुरु केलेली आहे. कारण सदगुरुनी म्हटले आहे की,

**एकै साधै सब सधै, सब साधै सब जाए। माली सींचै मूल को, फले-फूले अघाए।।**

एक कबीर परमेश्वराच्या भक्तीमध्ये, ते पण केवळ तत्वदर्शी संतांकडून नाम ग्रहण केल्यानंतर लाभ हा झाला की, संतरामपालजी महारांनी आपल्या कोठ्यामधून माझे आयुष्य वाढवून दिले. ही गोष्ट मी तसेच माझ्या परीवारातील व्यक्तींनी पी.जी.आय.एस.एम. मधील कार्यरत डॉक्टर तसेच दुसऱ्या इतर कर्मचारी वर्गास सांगितले. परंतु त्यांना काहीच समजले नाही. कारण या गोष्टी त्यांनाच समजू शकतील, ज्यांचा चैनल परमेश्वराने चालू केलेला आहे. अन्यथा या ज्ञानास समजणे असंभव आहे.

मी २५-१२-१९९९ रोजी तत्वदर्शी संतरामपालजी महाराजजींकडून नामदान ग्रहण केले. तेव्हा मला माहित नव्हते की हेच सद्‌गुरुजी पूर्ण ब्रह्म कबीर साहेबांचे वास्तविक अवतार घेऊन आलेल आहेत. जेव्हा माझ्याबरोबर उपरोक्त घटना घडली, तेव्हा माझा हा विश्वास बसला कि,

**माँसा घटे न तिल बढे विधना लिखे जो लेख। साचा सतगुरु मेट कर ऊपर मारें मेख ।**



कबीर परमेश्वर सशरीर संत रामपालजी महाराजांच्या रुपामध्ये आलेले आहेत जे की वास्तविक खरे सद्‌गुरु आहेत आणि विधानाचे (भाग्याचे) पाप कर्मे रुपी लेखास नष्ट करून आपल्या शक्तीने नवीन लेख लिहित आहेत.

## ''भक्तमति सुशीलाचे नेत्र ठीक केले.''

याच प्रकारे माझी धर्मपत्नी श्रीमती शीला हुड्डा हिला दि.६/१२/२००४ ला उजव्या नेत्राने वस्तूच्या दोन-दोन प्रतिमा दिसू लागण्यास प्रारंभ झालेला होता. पि.जी.आय.एस.एम. रोहतक हॉस्पीटलमधील सर्व तपासण्या (टेस्ट) एम.आर.आय. तसेच एम.आर.आय. एन्जीओग्राफी इत्यादी करून घेतल्या. तसेच सर्व वरीष्ठ डॉक्टरांनाही दाखवून उपचारही करून घेतले. परंतु काहीच लाभ झाला नाही. खाजगी डॉक्टर ईश्वरसिंह इत्यादीनाही दाखविले. तरीही काहीच लाभ झाला नाही. हे सर्व आम्ही सदगुरुजींकडून आज्ञा घेतल्यानंतर केलेले होते. परंतु जेव्हा औषधोपचारांपासूनच काहीच लाभ झाला नाही त्यावेळी आम्ही सद्‌गुरुशी प्रार्थना केली कि परमेश्वर आपण आयुष्य सुद्धा वाढवून देता, तेव्हा आपल्यासाठी हे काय कठीण आहे? कृपया आपण आपल्या ह्या बालकावर कृपा सुद्धा करावी''. सद्‌गुरुंनी कृपा केली. डोळ्यावर हात ठेवताच उजवा नेत्र एकदम ठीक झाला आणि एका वस्तूच्या दोन-दोन प्रतिमा दिसणे हेही बंद झाले. जसे पूर्वी दिसायचे तसेच दिसू लागले.

आता त्यांना पूर्ण परमात्मा, पापकर्मांना जाळून नष्ट करणारे, भगवान नाही म्हणायचे तर काय म्हणायचे? कृपया वाचकांनो स्वयं वाचून निर्णय घ्या. अन् अतिशिघ्र आपणही आपले मान, गर्व, अहंकार व शास्त्रविधीरहित साधना त्यागून सतलोक आश्रम करौंथा येथे येऊन परमपूज्य पुर्ण सद्‌गुरु रामपालजी महाराजजींकडून नामउपदेश ग्रहण करून आपले व आपल्या परिवाराचे कल्याण करून घ्यावे ''सत साहेब''.

**प्रार्थी-भक्त डॉ. ओमप्रकाश हुड्डा**

## ''तिन्ही तापांना पूर्ण परमात्माच समाप्त करू शकतो''

भक्त राजकुमार ढाका (पूर्व हेड मास्टर, एम.ए.बी.एड.) यांचे प्रमाण.

मी राजकुमार ढाका रिटायर हेडमास्टर दिल्ली (एम.ए.बी.एड्.) गाव-सुंडाना, जिल्हा-रोहतक, हरीयाणा. वर्तमान पत्ता- आजाद नगर, रोहतक. येथील रहिवासी आहे. सन १९९६ पासून माझ्या पत्नीस व माझ्या दोन्ही पुत्रांना एक अत्यंत भयंकर व्याधी होता. ह्या व्याधी पासून एवढे त्रासीत झाले होते की, दोन्ही पूत्र म्हणू लागले की, ''या झालेल्या आजाराने नोकरी करू शकत नाही.'' कारण की या व्याधीने घसा कोरडा होऊन शब्द येणे बंद होऊन श्वासही घेणे बंद होत होते. तेव्हा डॉक्टरांना आणून निद्रेचे इंजेक्शन ते द्यायचे. परंतु रात्री ड्युटी असताना ते इंजेक्शन कसे काय घेऊन जायचे? अत्याधीक चिंता निर्माण होत असे. अधिकारीही मला

बोलावून घेत होते. मी त्यांना सर्व काही सांगितले तेव्हा, ते म्हणायचे की, ''उपचार करून घे.'' जेव्हा घरी असेल त्यावेळी डॉक्टरांना रात्रीमध्ये दोन-दोन वेळा येणे भाग पडत होते. कारण कधी घरातील ह्या व्यक्तीसाठी तर कधी दुसऱ्या व्यक्तीसाठी त्यांना यावे लागायचे. जर कोणास संशय वाटत असेल तर डबल फाटकावर डॉ. सचदेव यांचा दवाखाना आहे. डॉ. सचदेव साहेबांना विचारा कि, मास्तरजीच्या घरी काय स्थिती आहे?

ज्यांनीही जेथे कोठे जाण्यास सांगितले तेथे आम्ही गेलो. उत्तर प्रदेश मधील 'कराना शामली'कडे, उत्तर प्रदेशामधील खेखडा, राजस्थान मधील बालाजी येथे बऱ्याच वेळा, खाटू श्यामजी व कित्येक स्थानच्या जन्म मन्त्र करणाऱ्यांकडे हरियाणामधील तर मी कोणतेच स्थान सोडले नाही. परंतु काहीच लाभ झाला नाही. कंडेला जवळील खेडा कंचनी, बोहतावाला, गोहानाजवळील गाव समयाना, सिकंदरपुर, खिडवाली इत्यादी अनेक स्थानी गेलो. अन् जवळजवळ तीन लाख रुपये खर्च केले पण कोणताच लाभ झाला नाही.

मी थकलो अन् माझा परिवार ढासळू लागला. माझ्या पत्नीने मला म्हटले कि, ''माझे जीवन आता समाप्त होणार आहे आता भक्त सुभाष पुत्र महेंद्र जो पोलीस आहे. तो ज्या संतरामपालजी महाराजांची महिमा सांगत असतो. मला त्याच संताकडून नाम उपदेश द्या''. पूर्वी मी कोणत्याही गोष्टीवर विश्वास ठेवत नव्हतो. तसेच गुरु बनविणे तर फारच कमीपणाचे समझत होतो. म्हणत असे की, ''तुझा गुरु तर मीच आहे. मी एम.ए.बी.एड. आहे. माझ्यापेक्षा मोठा कोण गुरु असेल?'' परंतु परिस्थितीने मला विवश केले आणि मी माझ्या पत्नीस नाम उपदेश घेण्याची संमती दिली. आणि म्हटले की, ''आपले जीवन शेष नाही, तेव्हा आपण नाम उपदेश जरूर घ्या.'' कारण त्या वेळी माझ्या पत्नीचे वजन ५० किलो एवढेच राहिलेले होते. पूर्वी तिचे वजन ८० किलो इतके होते. उठण्या बसण्या इतकीच ती राहिलेली होते. चालायचे-फिरायची गोष्ट तरी फार दूरची होती. मी म्हटले, ''आता मरत तर आहेस, तेव्हा नाम घेऊन पाहा आपल्या मनाची ही आणखी एक ईच्छा करून बघ. आता तूला मी विरोध करणार नाही. नाम उपदेश घे. ठीक आहे.'' कारण संतरामपालजी कडून नाम घ्यावे म्हणून ते सांगण्यासाठी दोन-तीन महिन्यांनी आमचा भाचा सुभाष सतत येत होता. अन् म्हणायचा की, ''ताई नाम घ्या. नाहीतर मराल?'' मी म्हणत असे कि, '' कोणताही डॉक्टर सोडलेला नाही. आम्ही बालाजी इत्यादी सर्व तांत्रिकां कडेही डोके आपटून घेतले. तेव्हा तुमचा संत काय करणार?''

परंतु शेवटी वैतागून कोठेच कोणताही लाभ झालेला नाही. म्हणून नाम घेण्यासाठी तिला पाठविले. कारण मी सुद्धा आपल्या परिवाराने आश्रमात जाण्याच्या सक्त विरुद्ध होतो. '१६ जानेवारी २००३' मध्ये माझ्या पत्नीने नाम उपदेश घेतला आणि 'गहरी नजर गीता मे' नावाचे पुस्तक सोबत घरी घेऊन आली. एका महिन्यामध्ये जसे दीपकामध्ये तेल घातल्यानंतर



प्रकाश होतो. त्याचप्रमाणे घरभर प्रकाश झाला. प्रत्येक महिन्यात तिचे तिन किलो वजन वाढू लागले. तेव्हा जेष्ठ पुत्रासही नाम ग्रहण न करताही केवळ मातेने नाम उपदेश घेतल्याने चांगली झोप येऊ लागली. त्याने आपल्या पत्नीस नाम प्राप्त करवून दिले. नंतर मी 'गहरी नजर गीता में' नामक पुस्तक वाचले. जेव्हा मी खोलवर जाऊन विचार केला तेव्हा समजले की, असे सत्य ज्ञान कधीच वाचलेले नाही अन् ऐकलेलेही नाही. मी एप्रिल २००३ मध्ये नाम उपदेश घेतला. आज माझ्या घरी मोठ्यापासून बालकापर्यंत सर्वांनी नाम उपदेश घेतलेला आहे.

जेव्हा ही व्याधी होती, तेव्हा सर्व घर भितीने, त्रासाने, थरथरायचे, भांडण-तंटे, नोकरीमधील विवादक, डॉक्टरांचे येणे-जाणे तसेच उपचारासाठी तातडीने दवाखान्यामध्ये घेऊन जाणे ह्या सर्व गोष्टी होत होत्या. आज आमचे घर स्वर्गासमान आहे. अन् सतलोक जाण्याची ईच्छाच सर्वांना आहे.

एक महिन्यापूर्वी स्वप्नामध्ये परमेश्वर कबीरसाहेबांनी गुडगांव सेक्टर ५७ मध्ये प्लॉट आरक्षीत करून गेले. जेव्हा ड्रॉ काढला तेव्हा तोच प्लॉट नंबर प्राप्त झाला, जो स्वप्नामध्ये कबीर परमेश्वरांनी सांगितलेला होता. प्रात: वर्तमानपत्र वाचले तर तोच प्लॉट नं. मंजूर झालेला होता. आमच्या येथे अशी व्याधी होती की, कोणीही एवढे दु:खी असणार नाही, तेवढे आम्ही होतो. आता संत रामपालजी महाराजांकडून नाम उपदेश घेतल्यानंतर अत्यंत कमी दिवसामध्ये आम्ही अत्यंत सुखी झालेले आहोत.

माझ्या घरावर 'जिन्द' (पिशाच्च) प्रकट झाले त्याने सांगितले की, ''मी आपल्या आश्रमामध्ये जातो. सर्व काही पाहून येतो. परंतु मी काचेपलीकडे जात नाही. जेथे संतजी विराजीत होऊन सत्संग करतात. कारण मला सर्व गोष्टीची माहिती आहे. जर मी तेथे गेलो तर माझी चांगलीच पिटाई होईल. यासाठी पुन्हा बाहेर येतो आणि तुम्ही कित्येक तांत्रिकाच्याकडे गेलात किंवा बालाजीस गेला मी आत जातच नव्हतो. बाहेरच राहत होतो. मला कोणी बांधणारा नाही. माझे साथी भित्रे होते. ते पळून गेले. परंतु मी जाणार नाही. मला अशाप्रकारे शिकवून पाठविले आहे की, मला तुझे घर व तुझ्या कन्येचे घराचा नाश करायचा आहे. त्यानंतर एका पाठोपाठ एक सर्वांचा विनाशाचा क्रमांक येईल. वाटले तर तूम्ही कोठेही पळून जा.''

काही दिवसानंतर तेच प्रेत घरामध्ये प्रकट झाले आणि जोर-जोरात ओरडू लागला, ''कोठे आहेत तुझे गुरु रामपाल?' कोठे आहे तुझे स्वामी कविर्देव (कबीर परमेश्वर) जेव्हा तो प्रकट व्हायचा, मनुष्यासमान संवाद करत असे. तेव्हा लगेच माझी पत्नी आमच्या घरी बनलेल्या अधिष्ठान पूजा स्थळी जाऊन दंडवत प्रणाम केला. तेव्हा पिशाच्चाची पिटाई सुरु झाली अन् पिशाच्च म्हणू लागले, ह्या भिंतीनाच आता पाडून टाकतो. त्याची चांगलीच पिटाई झाली. तेव्हा तो पिशाच्च म्हणू लागले, ''ही तर भिंत नाही. लोखंडाचे जाळे आहे. हे मालिक रामपालजी कोठून बरं आला तुम्ही? ते तर बरवाला सत्संग करण्यासाठी गेलेले होते. (त्या दिवशी संत

रामपालजी महाराज बरवाला, जिल्हा-हिसार येथे सत्संग करण्यासाठी गेलेले होते.) अन मी तर यासाठी आलो की, मालिक (स्वामी) येथे नाहीत''.

पिशाच्चाने सांगितले कि, ''मी तर आलो होतो, तुमचा पूर्णत: विध्वंस करायला. नाश करायला आलो होतो परंतु माझाच नाश झाला. मला नरकामध्ये टाकतील, मी जातो, मला मुक्त करा. करौथा आश्रमामध्ये संत रामपालजी बसलेले आहेत त्यांना मनुष्य समझु नका. तेच पूर्ण परमात्मा आहेत, त्यांना अजिबात सोडू नका. नाहीतर नुकसानच नुकसान करून घ्याल.'' असेच खेडा कथनी येथील पंडितही उपचार करीत होते.

जेव्हा मी खेडा कंचनी येथे गेलो होतो तेव्हा त्या पंडिताने सांगितले कि, ''आपला परिवार एका नंतर एक मृत्यू होऊन नष्ट होईल.'' मी हे मानले नाही. परंतु शाहपूर मध्येच माझ्या बंधूच्या कन्येचा विवाह करून ठेवलेला आहे. तसेच ते पंडितही शाहपूरचेच आहेत. अन् नंतर त्या पंडितनी आमच्या चौधरीस सांगितले कि, ''रोहतकच्या चौधरी रामकुमारच्या येथे अत्यंत भयंकर आजार आहे. अन् त्यात सर्व परिवार नष्ट होऊन जाईल. त्यांना बोलवून आणा.'' तेव्हा आमच्या चौधरी साहेबांनी त्यांच्या पुत्रास माझ्याकडे पाठवून दिले. त्याने म्हणजे जिलेसिंहने सर्व सत्यता कळविली आणि आम्हांस सोबत नेले. बोलवणे सोपे होते. परंतु उपचार तर अत्यंत अवघड होते. त्या पंडीतजींच्या ते आवाक्यात नव्हते. मंगळवार ते शनिवार च्या रात्री पाच पाच झटके (पिशाच्च बाधा) येत असे. पंडीतजी त्यांना उतरून शेजारील तलावात त्याचा उतारा टाकायचे. हा कार्यक्रम चार वर्षे पर्यंत चालत राहिला. नंतर त्या पंडीतजीने हात वर केले (माघार घेतली). एका तांत्रिकाकडे गेलो. त्याने सांगितले की, ''हा तूमचा आजार मी नष्ट करेल. आपल्या आजाराची माहिती, निदान मला माहिती आहे. तो कित्येक वेळा आम्हास बालाजीलाही घेऊन गेला. न त्याच्या मुठीत हा आजार आला नाही अन् त्याच्या त्या मंदीराने . कारण मंगळवार व शनिवारास पिशाच्चाच्या झटक्यांनी त्यासही अगदी वैतागून सोडले अन् त्यानेही हात वरती केले. (माघार घेतली.) कारण झटके जेव्हा यायचे तेव्हा जवळ सुद्धा संदेश यायचा की, रात्री ९ ते २ वाजेपर्यंत अग्नी पेटवून पाण्याचा तांब्या घेऊन आणि काठी घेऊन जागायचे आहे. हा कार्यक्रम सन १९९६ ते २००२ पर्यंत चालत राहिला. 'बोहता 'येथील त्या तांत्रिकाकडे घेऊन गेल्यानंतर जेव्हा पिशाच्चाचा झटका आला तेव्हा त्यातून एक चिठ्ठी मिळाली. त्यात त्या बोहताच्या तांत्रिकास म्हटलेले होते की, या मधून बाजूला होत, तुला पन्नास हजार रुपये दिले जातील. अन्यथा तुझी ही खैर नाही.'' त्याने भयभीत होऊन नकार दर्शविला. मला दिवसा दिल्ली मध्ये नोकरीस जावे लागे. अन् मी रात्री पहरा द्यायचो. काही रात्री डॉक्टरांस बोलवून आणायचो. माझी अत्यंतीक दुर्दशा झालेली होती. मी उपरोक्त कामाने अन् सर्व परीवार आजाराने अत्यंत वैतागुन गेलेला होता. कोणास सांगावे तर चेष्टा करत होते. कोणीही साथ दिली नाही. पुष्कळ धन (जवळजवळ ३ लक्ष रुपये) खर्च झालेले होते.



माझी पत्नी चांदकौर हिला थॉईरॉईड (गलगंड) ही व्याधी झालेली होती. जनवरी २००३ मध्ये डॉक्टर ओ.पी.गुप्ता ने थॉईराईडसाठी तिमारपुर दिल्ली येथील हॉस्पिटलध्ये दाखल करण्यासाठी सांगितले. परंतु तेथे न जाता मी डॉ.चुग जे ह्यासंबंधी विशेषतज्ञ होते. त्यांच्याकडे उपचार करून घेतले. त्याने म्हटले कि, सर्व आयुष्यभर औषधे खावी लागतील परंतु आता २००३ मध्ये नाम उपदेश घेतल्यानंतर औषधे खाण्याचे पूर्णपणे समाप्त झाले. मी डॉक्टर चुग यांच्याकडेही पुन्हा तपासणी करुन पाहिली. तर ते अचंबीत झाले की, ''हे कसे काय झाले?'' त्यांना सर्व गोष्टी मी सांगितल्या.

आता माझ्या पुत्राचे व पत्नीचे सर्व आजार बंदीछोड-सदगुरु रामपालजी महाराजांनी नष्ट केले आहेत. जेष्ठ पुत्राचे नाव सुरेंद्र कुमार तसेच कनिष्ठ पुत्राचे नाव मनोज कुमार असे आहे. दोघेही हरियाणा पोलीसामध्ये नोकरी करतात. ते दोघेही त्या जिन्द पिशाच्चाने ग्रस्त झालेले होते. तसेच घाल नावाच्या पिशाच्चानेही कित्येक वेळा त्यांच्यावर प्रघात केलेला होता. परंतु नाम उपदेश घेतला असल्याने परमात्मा कबीर साहेबजींनी त्यास वाचविले.

तत्वदर्शी जगतगुरु संत रामपालजी महाराजजी आमच्यासाठीच जसे काय अवतरले आहेत कारण ज्या परिवारामध्ये दोन पुत्र नोकरी करणारे परंतु दोघांनाही जिद पिशाच्च बाधा झाल्यास त्या घरामध्ये काय होईल? अन् ज्या स्त्रीच्या दोन्ही पुत्रांसह असा वाईट खेळ होत असेल अन् तिच्या स्वत:मध्येही जिन्द/पिशाच्च असेल तर काय जीवन असेल? जे लोक करौथा आश्रमाविषयी ज्ञान अर्जीत करत नाही ते लोक अजूनही अंधारामध्ये आहेत कारण वाचण्यासाठी बुद्धी दिलेली आहे. वाचा आणि विचार करा कि, वास्तविकता काय आहे?

आमच्या परिवाराचा सत्यानाश झालेला होता. जेव्हा माझे पुत्र आणि माझी पत्नी ठीक झाली. तेव्हा लगेच मी स्वत:स सदगुरु रामपालजी महाराजजींच्या चरणामध्ये समर्पीत केले. माझे काही नाही. हे तन-मन-धन सर्व काही गुरुजींच्या चरणामध्ये समर्पीत करीत आहे.

माझ्या कन्येने व जावयाने ही नामउपदेश प्राप्त केलेला आहे. आज माझ्या मुलीच्या घरी ही स्वर्ग बनलेला आहे. माझा जावई मद्यपान करत असे. त्यानेही मद्यपान करणे त्यागलेले आहे. माझ्या कन्येचे प्रमोशन, प्लॉट, घर इत्यादी काही दिवसांमध्येच प्राप्त झालेले आहे.

सन २००३ मध्ये बंदीछोड गुरु रामपालजी महाराजांनी आमच्या पापकर्मांरुपी वाळलेल्या गवताच्या ढिगास सतनामरुपी अग्निने जाळून नष्ट करुन टाकले. न कोणता गंडा, न कोणती दोरी, न भस्म, न ताबीज इत्यादी काहीच नाही. फक्त बंदीछोड यांनी दिलेले नाम (मंत्र)ने सर्व रोग नष्ट झालेत. मंत्र तर मोक्ष प्राप्तीसाठी सर्व बंधनातून मुक्त करून सतलोकामध्ये जाण्याचा आहे. हे सर्व रोग तर आपोआपच कविर्देवांच्या कृपेने समाप्त होतात जर असे होत नसेल तर भक्तीपासून विश्वास उडतो. आता आम्ही अत्यंत सुखी आहे. आता कोणी वाटेल ते केले तरी, आमच्या घरी काही होत नाही. कारण, आम्ही बंदीछोड कबीर साहेबजींचे हंस असुन,

त्यांच्या चरणामध्ये आम्ही आहोत. मी प्रारंभी मानत नव्हतो. ह्या गोष्टींना पाखंड समजत होतो. परंतु जेव्हा जेव्हा एका पाठोपाठ एकास डॉक्टरांकडे घेऊन नेण्यात आले. आजाराच्या उपचारासाठी पुष्कळ धनही लागले. त्रासही झाला. तेव्हा कोठे नेत्र उघडले. वास्तवामध्ये जाळ्यामध्ये अडकून बसलेली आहे. यामुळे भूत प्रेत नसतात ह्या आपल्या भ्रमास विसरून द्या. मी म्हणतो हे असत्य नाही. वास्तवामध्ये आहे कारण त्या त्रासाने मी माझ्या घरास उध्वस्त करून टाकले असते. यासाठी सर्व वाचकांना प्रार्थना आहे की, '' आपणही आपल्या समस्त दु:खापासून मुक्त होण्यासाठी व सत्यभक्ती करण्यासाठी सतलोक आश्रम करौथा मधील परमपुज्य संत रामपालजी महाराजांच्याकडून विनामुल्य उपदेश प्राप्त करून आपले मनुष्यजीवन सफल करा.

- प्रार्थी, **हेडमास्टर राजकुमार** (एम.ए.बी.एड.)

उपरोक्त काही भक्तात्म्यांच्या आत्मकथा आपण वाचल्यात असे असे हजारो-लाखो भक्त आहेत जे आपल्या आत्मकथा पुस्तकांमध्ये लिहिण्याची इच्छा करीत आहे. परंतु येथे स्थानाच्या अभावी आम्ही काहीच भक्तांच्या आत्मकथा देऊ शकलो. जर सर्व भक्तांच्या आत्मकथा आम्ही लिहिण्याचे म्हटले तर, कदाचित शंभर पुस्तके छापली जातील. याकरीता समजदार व्यक्तीस फक्त इशाराच पुरेसा आहे.

**भक्तींमधील फरक :** भक्ती-भक्तामध्ये बराच फरक असतो. आपण वाटल्यास कोणत्याही देवी/देवताची भक्ती करा, त्याचे फळ अवश्य मिळेल. जे कि नाशवान असेल. परंतु मुक्तीही मिळणार नाही आणि पाप कर्मे सुद्धा समाप्त होणार नाहीत. ती भोगण्यासाठी वारंवार जन्म घ्यावा लागेल. मुक्ती तर केवळ पूर्ण संतांच्या शरणामध्ये जाऊनच अर्थात त्यांच्याकडून नाम उपदेश घेऊन पूर्ण परमात्म्याची भक्ती केल्यानेच प्राप्त होईल अन्यथा नाही.

**ये संसार समझदा नांही, कहंदा श्याम दुपहरे नूं ।**
**गरीबदास ये वक्त जात है, रोवेगो इस पहरे नूं ।।**





# ९. कबीर साहेबांचा काळाशी संवाद

जेव्हा परमेश्वराने (कबीर साहेबांनी) सर्व ब्रह्मांडाची रचना केली त्यांनी आपल्या लोकामध्ये (सतलोकामध्ये) विश्राम करू लागले. त्यानंतर आपण सर्वजण काळाच्या ब्रह्मांडामध्ये राहून आपले कर्मकाण्ड भोगू लागलो. अन् अत्यंत दु:खी झालो. सुख व शांतिच्या शोधामध्ये भटकू लागलो. आपणास आपले निजघर सतलोकाची आठवण येऊ लागली. तसेच तेथे जाण्यासाठी भक्ति करण्यास आम्ही सुरुवात केली. आणि चार वेदांना कंठस्थ (पाठांतर) केले, तर कोणी उग्र तप करू लागले. आणि हवन, यज्ञ, ध्यान, समाधी इत्यादी साधना प्रारंभ केल्या. परंतु आपल्या निज (स्वत:चे खरे) घरी सतलोकास जाऊ शकलो नाही. कारण उपरोक्त साधना करून पुढील जन्मी चांगल्या प्रकारे समृद्ध जीवन प्राप्त होऊन (जसे राजा, महाराजा, मोठा व्यापारी, अधिकारी, देव-महादेव स्वर्ग-महास्वर्ग इत्यादी) नंतर पुन्हा आपण ८४ लाख योनीमधील कर्मे भोगू लागलो. अत्यंत कष्टामध्ये राहू लागलो. अन् परमपिता परमेश्वराशी प्रार्थना करू लागलो कि, ''हे दयाळू परमात्मा! आम्हास निजधामास (स्वत:च्या खऱ्या) घराचा रस्ता दाखवीण्याची कृपा करा. आम्ही हृदयाने आपली भक्ती करत आहोत. आपण आम्हास दर्शन का देत नाही?''

कबीर साहेबांनी हा वृत्तांत धर्मदासजीस सांगताना म्हटले की, ''ह्या जीवांची हाक ऐकून मी आपल्या सतलोकातून सहसदासाचे रुप बनवून काळलोकामध्ये आलो. तेव्हा २१ ब्रह्मांडामध्ये जेथे काळाचे स्वत:चे निज घर आहे. तेथे पोहोचलो, तेथे तप्तशिलेवर जीवांना भाजून त्यांच्या सुक्ष्मशरीरातील गंध मळ (घाण) काढला जात होता. माझ्या पोहोचल्यानंतर त्या जीवात्म्यांचे जळणे समाप्त झाले. त्यांनी मला पाहून विचारले, ''हे पुरुष। आपण कोण आहात? आपल्या दर्शनमात्रानेच आम्हास मोठ्या सुख व शांतीचा आभास होत आहे.'' नंतर मी सांगितले कि, ''मी पूर्णब्रह्म (पारब्रह्म) परमेश्वर कबीर आहे. आपण सर्व जीव माझ्या लोकातून (सतलोकातून) येऊन काळब्रह्मच्या लोकामध्ये फसलेले आहात. हा काळ प्रतिदिन एक लक्ष मानवाच्या सूक्ष्म शरीराचा गंध (मळ) काढून खातो. अन् नंतर नाना प्रकारच्या योन्यांमध्ये दंड भोगण्यासाठी सोडत असतो.'' तेव्हा हे जीवात्मे म्हणू लागले कि, ''हे दयाळू परमेश्वर, आम्हास या काळाच्या तुरुंगातून मुक्त करा.'' मी (कबीर साहेबांनी) सांगितले की, ''ही ब्रह्मांडे काळाने तीन वेळा भक्ती करून माझ्यापासून प्राप्त केलेले आहेत. जो आपण येथील सर्व वस्तुंचा प्रयोग करत आहात त्या सर्व वस्तू काळ (ब्रह्म) च्या आहेत आणि आपण सर्व आपल्या ईच्छेने पर्यटनासाठी फिरण्यासाठी आलेला आहात. त्यामुळे आता आपणावर ह्या काळ ब्रह्माचे

पोलिसमध्ये नोकरीला आहेत. माझ्या सर्व शरीरावर फोड, कांजिण्या उठत. घरातील कटकटींमुळे माझे पती रामेहर यांचे मानसिक संतुलन बिघडायचे.

या सर्व त्रासातून मुक्त होण्यासाठी आम्ही सन १९९५ ते जुलै २००० पर्यंत डझनभरापेक्षा जास्त लोभी, लालची गुरूंचे दरवाजे खटखटवले. भारतामधील यमुना, गंगा, हरिद्वार, ज्वालाजी, चामुंडा, चिंतपुरनी, नगर, कोट, बालाजी, मेहंदीपूर, गुडगावची माई, गौरख टिला (किल्ला) राजस्थान आदी अनेक तीर्थस्थानी मुलांसोबत अनेक वेळा जाऊन आलो, परंतु त्यातून कोणताच फरक पडला नाही.

आमच्या परिवाराची स्थिती अशा अवस्थेपर्यंत पोहोचली होती, की आम्ही होळी, दिवाळी हे सणसुद्धा एखाद्या मशिदीमध्ये बसून व्यतित करत होतो.

आम्हाला संत रामपालजी महाराजांद्वारे परमपूज्य कबीर परमेश्वरांना शरण येण्याचा लाभ मिळाल्यामुळे आम्ही अत्यंत नशीबवान आहे. आता ते काळाचे दूत, ते आमच्या रोगांवर ऑल इंडिया हॉस्पिटलमध्ये केले जाणारे उपचार हे सर्व कोठे गेले? सद्‌गुरुदेवांच्या चरणांच्या धुळीपुढे ते टिकू शकले नाहीत.

एका काळची पूजा करण्याऱ्या मांत्रिकाने २५ फेब्रुवारी २००१ ला फोन करून विचारले, की अपलेश तुमचेच नाव आहे का? मी होकार देऊन आपण आपले नाव सांगा म्हणाले, तेव्हा तो मांत्रिक म्हणाला, की हा बलवान कोण आहे? तुमचा कोण लागतो? मी म्हणाले, की तुम्ही कोण आहात, आपले नाव काय आणि हे सर्व तुम्ही का विचारत आहात? तेव्हा तो मांत्रिक म्हणाला, की मुली, तू माझे नाव विचारू नकोस. ते मी सांगू शकत नाही. मी हांसी येथून बोलत आहे. हा बलवान आणि त्याच्याबरोबर एक व्यक्ती माझ्याकडे आले होते आणि ते दोघे तुमच्यावर घाला घालण्यासाठी मला तीन हजार सातशे रुपये देऊन गेले आहेत. माझ्याजवळ तुमचा फोन नंबर नव्हता. तुमची दुरवस्था झाली किंवा नाही हे पाहण्यासाठी मी तुमचा फोन नंबरसुद्धा बलवानाकडून घेतलेला होता. हे वाईट काम मी रात्रीच्या वेळी केले, परंतु जेव्हा मी झोपायला गेलो, तेव्हा मला श्वेत वस्त्रांमध्ये ज्या गुरूंची तू पूजा करतेस, ते दिसले. त्यांनी मला सांगितले, की याचा परिणाम तू स्वत: भोगशील. हा सर्व परिवार सर्वशक्तिमान सर्व कष्टहरण परमपूज्य कबीर परमेश्वरांना शरण गेलेला आहे. तुझी लायकी काय आहे? येथील धर्मराजसुद्धा आता या परिवाराचे काही वाकडे करू शकत नाही.

**गरीब, जम जौरा जासै डरै, मिटें कर्म के लेख।**
**अदली अदल कबीर हैं, कुल के सद्‌गुरू एक।।**

परमपूज्य कबीर परमेश्वरजींना यम (काळ आणि काळाचे दूत) आणि मृत्यूसुद्धा घाबरतात. ते पूर्ण प्रभू पापकर्म दंडाचा लेखसुद्धा समाप्त करतात.

त्यानंतर तो मांत्रिक म्हणाला, की, मुली, तुला मी एवढेच सांगतो, की तू ज्या देव



पुरुषोत्तमाची पूजा करतेस, ते अत्यंत प्रबल शक्तियुक्त आहेत. मी गेली २५ वर्षे हे घाला घालण्याचे काम करत आहे. आजपर्यंत किती परिवार मी उद्‌ध्वस्त केले आहेत, कुणास ठाऊक, परंतु आज प्रथमच मला पराजय स्वीकारावा लागला. मुली, या शक्तीचा तू त्याग करू नकोस, नाही तर मार खाशील. तुमच्या विनाशासाठी बलवान आणि त्याचे साथीदार फिरत आहेत. मी म्हणाले, की आम्ही पूर्ण परमात्म्यांची पूजा करतो आणि बलवान हा माझ्या पतींचा मोठा भाऊ आहे. तो आमचा जीवघेणा शत्रू बनलेला आहे.

आम्ही आज एवढे नशीबवान आहोत, की आम्ही एखादी वस्तू अथवा कार्याची इच्छा व्यक्त केली, तर हे सद्‌गुरुदेव आणि कबीरसाहेब ती पूर्ण करतात.

**आज गुरू गोविंद दोनों खडे, हम किसके लागे पाय।**
**हम बलिहारी सद्‌गुरुदेव रामपालजी के चरणों में जिन्हे परमेश्वर दिया मिलाय।।**

बंधू आणि भगिनींनो, आमचा सर्व परिवार मिळून तुम्हाला संदेश देत आहे, की जर तुम्हाला सत्‌लोकीचा मार्ग, पूर्ण मोक्ष व सर्व सुख प्राप्त करायचे असतील आणि सांसारिक दु:खांपासून सुटका करून घ्यायची असेल, तर बंदी छोड संत रामपालजी महाराजांकडून सत्‌नाम प्राप्त करवून घ्यावे आणि आपला अनमोल मनुष्य जन्म सफल करून घावा.

सत्‌साहेब!

**-भक्तमती अपलेशदेवी**

## दु:खी परिवारास सुखी करणे

मी भक्त रामचंद्र सिंह हुड्डा, पुत्र श्री. अमरसिंह हुड्डा, पान्ना रामश्याणा, गाव-मकडौली कला, तहसील व जिल्हा- रोहतक (हरियाना) येथील रहिवासी आहे.

जेव्हा मी बंदी छोड सद्‌गुरू रामपालजी महाराजांचे नाम घेतले नव्हते, त्यावेळी माझी, माझ्या परिवाराची आणि पशूंची अतोनात हानी होत असे. ते माझे सर्व दु:ख मी कथन करतो.

मला दहा वर्षे सतत झटके येत होते. त्यामुळे उन्हाळ्याच्या दिवसांत डॉक्टर मला दिवसाला कमीत कमी चार बाटल्या ग्लुकोजचे सलाईन चढवत होते. याशिवाय औषधे वेगळीच असायची. अशाप्रकारे बराच पैसा खर्च करूनही मला फरक पडला नव्हता.

माझी पत्नी सुरेश २४ वर्षांपासून दम्याच्या (अस्थमा) रोगाने आजारी होती. तिला दररोज इंजेक्शन व औषधे घ्यावी लागत. दररोज किमान ३०-३५ रुपये खर्च व्हायचे, पण सगळेच व्यर्थ जायचे. पैशांची चणचण असूनही वर्षाला कमीत कमी १२ ते १५ हजार रुपये खर्च करायचो, पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही. तिला मी काहनौर, बिचपडी आणि पिंडारा येथेही घेऊन गेलो होतो.

माझी सर्वांत लहान मुलगी प्रीती चौथी इयत्तेत शिकत आहे. तिच्या आजीचे भूत तिच्यामध्ये प्रवेश करायचे. तिच्या उपचारासाठी अनेक मांत्रिकांनी कमीत कमी दहा हजार

रुपयांपर्यंत मागणी केली होती, परंतु माझी आर्थिक स्थिती चांगली नसल्यामुळे मी ते दिले नाहीत. माझा लहान मुलगा मंजित मार्च २००३ ला दोन वर्षांचा झाला आहे. त्यालाही जन्मापासून अपस्माराचे झटके येत होते. त्यामुळे मी अधिकच चिंताग्रस्त झालो होतो. माझा एक बैल शेतामध्ये साहित्य नेताना मध्येच अचानक मेला आणि दुसऱ्या बैलाला झटके यायचे. माझ्या म्हशीच्या एका सडामधून दूध यायचे बंद झाले आणि नवीन म्हैस विकत आणली, तर तिचे रेडकू जिवंत राहायचे नाही. त्या म्हशींचा उपयोग होत नसल्यामुळे मी त्या अत्यंत स्वस्तात विकायचो. माझ्या घरामध्ये पशुधनापासून कोणताच लाभ झाला नाही. फक्त नुकसान आणि नुकसानच होत असे. मांत्रिकांकडेसुद्धा खूप चकरा मारल्या. मांत्रिकांनी मला २४ अमावस्यांना पिंड स्नान घालण्यास सांगितले. त्यात माझा भरपूर पैसा खर्च झाला. नुकसान मात्र फार झाले.

मी, जेव्हा बंदी छोड कबीरसाहेब यांचे स्वरूप संत रामपालजी महाराज सत्लोक आश्रम, करौंथा येथून नामोपदेश घेतला, तेव्हापासून माझ्या परिवारातील कोणत्याही सदस्याला कोणत्याही प्रकारचा आजार झालेला नाही आणि कोठेही पैसा वाया गेलेला नाही. पशुधनामधून माझा उत्कर्ष साधला आहे. नामोपदेश घेतल्यानंतर माझी जी उधारी यायची होती, त्यातील काही पैसे परत मिळाले. संत रामपालजी महाराजांच्या कृपेमुळेच माझ्या जीवनामध्ये प्रसन्नता आली. आमच्या घरी अनेक पिढ्यांपासून गरीबदासजी महाराजांना छुडानीचे मानले जात होते. परंतु त्यामुळे कोणताच लाभ झाला नाही. संत रामपालजी महाराजांनी सांगितले, की आदरणीय गरीबदासजी महाराज सत्लोकी गेल्यानंतर तेथे छुडानी गावामध्ये परम संत राहिले नाहीत. केवळ महंत परंपराच चालू राहिली. महंतांना नामदानाचा अधिकार नाही. ते तर केवळ पवित्र स्मृतींचे राखणदार आहेत. म्हणूनच धामांवर गादी बनवून बसलेल्या महंतांपासून काहीच लाभ होत नाही. जेव्हा मी संत शिरोमणी गुरुदेव रामपालजी महाराजजींकडून नामोपदेश घेतला, तेव्हाच मला पूर्ण लाभ झाला.

## भक्त सतीशची आत्मकथा

मी भक्त सतीशदास, १९३ सेक्टर ७, आर.के. पुरम, नवी दिल्ली येथील रहिवासी आहे.

**पूजैं देई धाम कूं, शीश हलावै जो। गरीबदास साची कहै, हद काफिर है सो।।**

**कबीर, पर्वत-पर्वत मैं फिरा, कारण अपने राम।**
**राम सरीखे जन मिले, जिन सारे सब काम।।**

**- भक्त रामचंद्र दास**

या ओळी आमच्या जीवनाच्या चरितार्थ होतात. कारण सद्गुरू बंदी छोड रामपालजी महाराजांचा डिसेंबर १९९७ मध्ये दिल्ली येथील प्रीतमपुरामध्ये सत्संग झालेला होता. तेव्हा आम्ही माझ्या एका मित्राच्या सांगण्यावरून सत्संग ऐकण्यास गेलो, परंतु



पारंपरिक पूजेचा त्याग करण्याच्या गोष्टी ऐकल्यानंतर सत्संगामध्ये मन लागले नाही. सद्गुरू वारंवार शास्त्र वाचून आम्हाला समजावून सांगत होते, तेव्हा माझ्या मनात आले, की पुस्तके (ग्रंथ) आपण घरामध्येच वाचू शकत नाही का? अशाप्रकारे ज्योतिनिरंजनाने (काळ) आमची बुद्धी अयोग्यरीत्या स्थिर केली आणि आमचा भक्तिमार्गाचा स्रोतच बंद केला.

सद्गुरू आम्हाला समजावत होते, की

**गुरू बिन किन्हें न पाया ज्ञाना, ज्यों थोथा भूस छडे किसाना।**
**गुरू बिन भरम ना छूटें भाई, कोटि उपाय करो चतुराई ।।**

अशाप्रकारे आमची बुद्धी अयोग्यप्रकारे स्थिर झाल्यामुळे आम्ही इकडच्या तिकडच्या गोष्टी करत घरी परत आलो. सन १९९९ मध्ये माझी पत्नी श्रीमती मंजू हिला ब्रेन ट्युमर (मेंदूचा कॅन्सर) झाला. त्याविषयी आम्हाला सफदरजंग हॉस्पिटलमध्ये चाचण्या घेऊन उपचार करताना समजले. त्यानंतर मी तिला पंत हॉस्पिटल, ए.आय.आय.एम.एस. नवी दिल्ली, त्यानंतर अपोलो हॉस्पिटल, नवी दिल्ली येथील डॉक्टरनासुद्धा दाखविले. सर्व डॉक्टर लगेच ऑपरेशन करण्याचा सल्ला देत म्हणाले, की ऑपरेशनच्या दरम्यान हिच्या एका हाताला पॅरालेसीस (पक्षाघात) होऊ शकतो. अपोलो हॉस्पिटलमधील डॉक्टरनी रिपोर्ट पाहिल्यानंतर ते असेही म्हणाले, की हिचे दोन्ही डोळे अजून शाबूत कसे काय आहेत? त्याच वेळी त्यांनी आय स्पेशालिस्टकडून काही चाचण्या करून घ्यायला सांगितल्या. मी त्या चाचण्या लगेच करून घेतल्या. तेव्हा आय स्पेशालिस्ट आणि न्यूरो सर्जन यांनी सल्ला दिला, की प्रत्येक १५ दिवसांनी हिच्या डोळ्यांची तपासणी केली पाहिजे. कारण ब्रेन ट्यूमर अशा जागेवर आहे, की तिची दृष्टी केव्हाही जाऊ शकते. माझी पत्नी आणि मी दोन्ही पायांनी विकलांग आहोत आणि आता हात व डोळेच काम देणार नाहीत हे ऐकून आमचा वरचा श्वास वर आणि खालचा खाली राहिला, परंतु याशिवाय दुसरा कोणता उपायच नसल्याने आम्ही शेवटी पंत हॉस्पिटल, नवी दिल्ली येथे ऑपरेशन करण्याचा निर्णय घेतला. डॉक्टरांच्या सांगण्यानुसार आयएनएमएएस हॉस्पिटल, तिमारपूर, दिल्ली येथून एमआरआय चाचणी करवून घेतली. त्याचबरोबर इतरही आवश्यक त्या सर्व चाचण्या करवून घेतल्या. डॉक्टरांकडून केवळ ऑपरेशनची तारीख घ्यायची होती. आम्हाला पूर्ण परमात्मा तत्त्वदर्शी संत रामपालजी महाराजांच्या पूर्वी ऐकलेल्या सत्संगातील ओळी आठवल्या-

**जिन मिलते सुख उपजे, मिटें कोटि उपाध।**
**भुवन चतुर्दश ढूंढियों, परम स्नेही साध।।**

या ओळींचे स्मरण केल्याबरोबर आमचा भक्तिमार्ग परमेश्वराने खुला केला आणि मनामध्ये भावना उत्पन्न झाली, की ऑपरेशनपूर्वी नामोपदेश घेऊन पाहावे. त्यानंतर मी आपल्या मित्रांबरोबर प्रीतमपुरा, दिल्ली येथे जाऊन ४ फेब्रुवारी २००१ रोजी पूर्ण परमात्मा

तत्त्वदर्शी संत रामपालजी महाराजांकडून नामोपदेश घेतला. पूर्वीचे सर्वप्रकारचे पूजाविधी सोडून दिले. अखंड पाठ करण्याचा सल्ला देत सद्गुरुजी म्हणाले, की परमात्म्याची इच्छा झाली तर ऑपरेशन टळेल आणि सर्वकाही ठीक होऊन जाईल. आम्ही सद्गुरूंच्या आज्ञेनुसार घरामध्ये तीन दिवसांचा अखंड पाठ केला आणि त्यानंतर डॉक्टरांकडून ऑपरेशनची तारीख घेण्यासाठी पंत हॉस्पिटल, नवी दिल्ली येथे गेलो. जे डॉक्टर पूर्वी ऑपरेशनचा सल्ला देत होते, तेच डॉक्टर दुसरी एमआरआय चाचणी पाहून म्हणू लागले, की आता ऑपरेशनची काहीच आवश्यकता नाही. त्यावेळी सद्गुरूंची वाणी आठवली-

**सत्गुरू दाता हैं कलि माहिं, प्राण उधारण उतरे सांई।**
**सत्गुरू दाता दीन दयालं, जम किंकर के तोडें जालं।।**

...आणि आम्ही सद्गुरूंना आठवून हमसून हमसून रडू लागलो, की परमेश्वरा, आम्ही तुमच्या महिमेची कोणत्या शब्दांमध्ये व्याख्या करू. अशाप्रकारे पूर्ण परमेश्वर कबीरसाहेबांचे अवतार तत्त्वदर्शी संत रामपालजी महाराज यांच्या कृपेने माझ्या पत्नीचे ऑपरेशन टळले. त्यानंतर आम्हाला एका पैशाचीही औषधे खावी लागली नाहीत. आज आम्ही सुखमय जीवन जगत आहोत.

२० नोव्हेंबर २००४ च्या रात्री काळाच्या झपाट्याने माझी पत्नी प्राण निघून गेल्यासारखी पडली. तिला परमेश्वरांचे अमृतजल पाजल्यानंतर शुद्ध आली. नंतर आम्ही तिला सद्गुरुजींकडे घेऊन गेलो, तेव्हा सद्गुरू रामपालजींनी सांगितले, की आज हिचा मृत्यू होणार होता, पण कबीर परमेश्वरांनी तिचे आयुष्य वाढवून दिले आहे. आता तिला फक्त भक्ती करायची आहे.

त्यानंतर २२ नोव्हेंबर २००४ रोजी माझ्या पत्नीला सोनीपत येथे सत्संगामध्येच अर्धांगवायूचा झटका (पॅरालेसीस) आला. त्यात तिच्या हातांतील शक्ती नाहीशी होऊ लागली आणि त्याचवेळी तिला सद्गुरुजींचा हात आपल्या हातामध्ये दिसू लागला. जवळजवळ पाच मिनिटांपर्यंत हे दिसत राहिले. जेव्हा अर्धांगवायूचा प्रभाव संपला, तेव्हा सद्गुरुजींचा हात अदृश्य झाला आणि आजतागायत ती पूर्णपणे ठीक आहे.

सद्गुरू तत्त्वदर्शी संत रामपालजी महाराज, जे कबीर परमेश्वरांचे जसेच्या तसे अवतारात आलेले आहेत, त्यांनी आम्हाला असे सिद्ध करून दाखविले, की-

**गरीब जम जौंरा जासे डरें, मिटें कर्म के अंक।**
**कागज कीरें दरगह दई, चौदह कोटि न चंप।।**

सतीश कुमार मेहरा,
१९३, सेक्टर ७, आर.के.पुरम, नवी दिल्ली.



## भक्त सुखवीरची दु:खाने भरलेली कथा

श्री. हुड्डा यांनी करौंथा गावातील एका भक्ताने त्याच्यावर ओढवलेला प्रसंग सांगितला, तो असा- मी सुखवीर सिंह धनवड (सिट्टू), पुत्र स्वर्गीय श्री राम धनखड, गाव करौंथा, जिल्हा-रोहतक येथील रहिवासी आहे. माझा मोबाईल नं. ९३१५८१४३४३ आहे. माझे वडील १९९० मध्ये बी.एस.एफ.मधून निवृत्त होऊन घरी आले. सहा महिन्यांनंतर माझ्या वडिलांना मानसिक आजार जडला आणि १९९३ मध्ये त्यातच त्यांचा मृत्यू झाला. वडिलांच्या आजारपणात सर्व पैसा खर्च झाला. आम्ही निर्धन झालो होतो. आमच्या परिवारावर संकटांचा डोंगर कोसळला होता. माझ्या आईने काबाडकष्ट करून आमचे पालनपोषण केले. जून१९९९ मध्ये माझे मानसिक संतुलन बिघडू लागले. मी बीए.भाग-२ मध्ये शिकत होतो. माझ्या वडिलांची व्याधी मला जडली. माझ्या आईने रोहतक मेडिकल येथे माझ्यावर उपचार करून आणले, परंतु त्याचा काहीच फायदा झाला नाही. त्यानंतर खासगी डॉक्टर मेंटल स्पेशालिस्ट डॉ. गर्ग, डॉ. व्ही. पी. मैहल्ला यांच्याकडे उपचार सुरू केले. तेथेही काही फायदा झाला नाही. त्यानंतर माझी आई आणि नातेवाइकांनी मला मांत्रिकांकडे दाखवायला सुरवात केली. त्यांनी सांगितले, की जसा याच्या वडिलांचा मृत्यू झाला आहे, तसाच याचाही मृत्यू निश्चित आहे. त्यानंतर काही दिवसांनी याच्या लहान भावाचाही मृत्यू होईल. अशाप्रकारे पूर्ण परिवाराचा सर्व नाश निश्चित आहे आणि हे कोणीही टाळू शकत नाही. मांत्रिकांनी आपले उपाय सुरू केले. दररोज हजारो रुपये खर्च होऊ लागले, परंतु माझ्या स्थितीमध्ये सुधारणा होण्याऐवजी आणखीच खराब झाली. माझ्या आईने मांत्रिकांना हजारो रुपये दिले, परंतु काहीच फायदा झाला नाही. माझी आई दु:खीकष्टी होऊन म्हणू लागली, की हे भगवान! आम्हा तिघा माता-पुत्रांना या संसारातून सोडव. आता आणखी जास्त दु:ख सहन करण्याची क्षमता आमच्यात राहिलेली नाही.

त्यानंतर करौंथा गावातील ज्या भक्तांनी पूर्ण परमेश्वराचे अवतार संत रामपालजी महाराजांकडून नामोपदेश घेतलेला होता, त्यांनी माझ्या आईला सांगितले, की आपणही नामोपदेश घ्यावा. संत रामपालजी महाराजांविषयी ईर्षेखोर व्यक्तींनी पसरवलेल्या मिथ्या अफवांमुळे माझ्या आईला सुरवासुरवातीला विश्वास बसला नाही, परंतु ज्याला समोर मरण दिसत आहे तो शेवटी काय करणार नाही? डिसेंबर १९९९ मध्ये आम्ही तिघा माता-पुत्रांनी संत रामपालजी महाराजजींकडून नामोपदेश घेतला. त्यासाठी आम्हाला काहीच पैसा खर्च करावा लागला नाही. तथापि, एक प्रतिमा आणि एक मंत्रांचे पुस्तक मोफत मिळाले. जसा आम्ही नामोपदेश घेतला, तसे परमेश्वर कविर्देवांच्या शक्तीने सद्गुरू रामपालजी महाराजांच्या कृपेने मी पूर्णपणे बरा झालो. आमच्या घरामध्ये ज्या प्रेतात्म्यांचा वास होता, त्यांना माझ्या आईने स्वप्नामध्ये घरातून बाहेर पडताना पाहिले. ज्या तीन अपराधांच्या पापाने आम्ही दु:खी होतो,

त्यातून क्षमा मिळाल्यामुळे कविर्देवांच्या कृपेने सद्गुरू रामपालजी महाराजांच्या दयेने त्या दिवसापासून आजतागायत आमचे सर्व दु:ख दूर झाले. एक नोव्हेंबर २००० रोजी सद्गुरुजींच्या असीम कृपेने मी बी.एस.एफ.मध्ये भरती झालो. सद्गुरू रामपालजी महाराजांच्या कृपेने भरती होताना एक पैसाही द्यावा लागला नाही.

संत रामपालजी महाराजांच्या दयेने आज मी बी.एस.एफ.मध्ये चांगल्याप्रकारे कार्यरत आहे आणि माझ्या परिवारात आनंदीआनंद आहे. म्हणूनच सर्वांना माझी अशी प्रार्थना आहे, की आपण सर्वांनीसुद्धा संत रामपालजी महाराजजींकडून नामोपदेश घेऊन आपले जीवन सफल करावे. ते पूर्ण संत आहेत. ज्या व्यक्ती संत रामपालजी महाराजांवर खोटे आरोप करत आहेत, ते महापापाचे भागीदार होत आहेत. त्यांच्या एकाही आरोपात तथ्य नाही.

संत रामपालजी महाराजांचा मुख्य उद्देश तर प्रणिमात्रांना नामोपदेश देऊन, त्यांना भक्तिमार्गाला लावणे आणि काळाच्या जाळ्यातून मुक्त करणे हाच आहे. समाजसुधारणा व इतर सर्व सुख तर जसा गव्हाबरोबर भुसाही मिळतोच तसे आपोआपच मिळून जाईल.

श्री. विजेंद्र सिंह हुड्डा यांनी सांगितले आहे, की संत रामपालजी महाराजजींनी ऋग्वेदातील दहाव्या मंडलातील १६१ व्या सुक्तामधील दुसरा मंत्र पडद्यावर स्पष्टपणे दाखवत समजावले आहे, या मंत्रामध्ये स्पष्ट लिहिलेले आहे, की जर रोग्याचे जीवन संपणार असेल आणि त्याचा रोग असाध्य असला, तरी परमात्मा आपल्या शक्तीने त्याला रोगमुक्त करू शकतो. इतकेच काय, त्याला शंभर वर्षांचे आयुष्यही प्रदान करू शकतो.

**-सत्साहेब**

